






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



**मुखपृष्ठासंबंधी :** विविध ऋतूंमध्ये निसर्गात होणाऱ्या बदलांचा चित्ररूप मागोवा घेण्यासाठी अक्षरांच्या साह्याने वातावरणनिर्मिती केली आहे. ही अक्षरे पूर्णपणे नवनिर्मित असून संगणकावरच घडली आहेत. म्हणजेच यात पारंपरिक लेखन-साधनांचा वापर अजिबात केलेला नाही. आजच्या 'संगणक-युगा'त सौंदर्य-निर्मितीसाठी संगणक वापरतानाच संगणकामुळे सहजसाध्य होणाऱ्या कलात्मक परिणामांमुळे आपल्याही दृश्यकलाविषयक जाणिवा समृद्ध होत आहेत.

चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पन व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर

---

**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादन सल्लागार :** अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, २७१, नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.

---

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान याचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषासंस्थान सहमत असतीलच असे नाही.





# आपली भाषाविषयक जाणीव

आजच्या समाजाच्या भाषाविषयक जाणिवेबद्दल एखादे निश्चयात्मक विधान करणे धाडसाचे ठरेल. एक तर आजचा समाज एकसंध आहे असे दिसत नाही. नागर/ग्रामीण, व्यावसायिक/नोकरीपेशाचे, भिन्न आर्थिक स्तर, भिन्न जाती, भिन्न शैक्षणिक स्तर आणि जीवनमूल्यांत आणि सामाजिक प्रतिष्ठेबद्दलच्या कल्पनांत गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत होत गेलेले बदल ह्यांमुळे समाज एकसंध राहिलेला नाही. एकाच समाजात एकाच वेळी अनेक गट अस्तित्वात आहेत. त्यामुळे संपूर्ण समाजाच्या भाषाविषयक जाणिवेबद्दल कोणतेही निश्चयात्मक विधान करता येत नाही. जे विधान करावे ते आपल्या समाजगटापुरते आणि ज्या समाजगटांशी आपला संबंध येतो, त्या गटांपुरतेच खरे असण्याचा संभव आहे. (त्यामुळे प्रस्तुत लेखातील विधानेही अतिव्याप्त असण्याचा संभव नाकारता येत नाही.) समाजाची / भाषाविषयक जाणीव अनेक गोष्टींतून कळत-नकळत व्यक्त होत असते. वृत्तपत्रात प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांचेच उदाहरण घेऊ. पुण्या-मुंबईच्या वृत्तपत्रांत भाषाविषयक पत्रे प्रत्यही प्रकाशित होतात. अशी पत्रे लिहिली जाणे, वृत्तपत्रांनी ती प्रकाशित करणे ह्या वस्तुस्थितीवरून भाषाविषयक जाणिवेचा एक स्तर व्यक्त होत असतो. प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांतील आशयामधून त्या जाणिवेचा वेगळा स्तर व्यक्त होत असतो. पत्रे लिहिली जाणे व ती प्रसिद्ध होणे ह्यांमधून वृत्तपत्रांच्या वाचकांना व वृत्तपत्रांना भाषेबद्दल आस्था आहे हे दिसून येते. पण ही आस्था कितपत सुजाण आहे, कितपत सजग आहे ? त्यासाठी पत्रांच्या आशयाकडे पाहिले तर त्यांतून व्यक्त होणारी जाणीव कळकळीची पण बरीचशी उथळ असल्याचे लक्षात येते. त्यांचे विषय प्रामुख्याने दोन असतात : इंग्रजी व हिंदी शब्दांच्या रूपाने मराठीवर होणारे आक्रमण व शिक्षणाचे माध्यम. परभाषांमधून शब्द येणे ही एक नैसर्गिक व राजकीय-सामाजिक-आर्थिक वास्तवाशी निगडित असलेली वस्तुस्थिती आहे, ही जाणीव त्या पत्रांमधून अभावानेच आढळते. भाषा जीवनाचे प्रत्येक क्षेत्र व्यापते आणि त्या त्या क्षेत्रांतील रूढ, मान्यताप्राप्त, सत्ता-स्थितीनुसार ती रूप धारण करत असते. बोलभाषेच्या रूपापेक्षा लेखनाच्या भाषेचे रूप भिन्न असते. बोलतानाही, प्रसंग, सहभागी व्यक्ती, त्यांच्यामधील सामाजिक संबंध, औपचारिकता/अनौपचारिकता ह्यांचा संदर्भ असे अनेक घटक बोलल्या जाणाऱ्या भाषेचे रूप ठरवत

असतात. त्यामुळेच मराठीत ह्यापूर्वी फारशी, उर्दू, कन्नड, संस्कृत, इंग्रजी, गुजराती, बंगाली अशा अनेक भाषांतून शब्द आले आहेत व ह्यापुढेही येत राहणार आहेत. भाषेत शब्दांची उपलब्धता जितकी अधिक, तितकी तिची आविष्कारक्षमता अधिक. एकाच संकल्पनेसाठी अनेक शब्द असल्यास त्या संकल्पनेतील सूक्ष्म भेद व्यक्त करणे शक्य होते, शैलीचे अनेक स्तर व्यक्त होतात. उदाहरणार्थ, 'प्रेसिडेंट' व 'चेअरमन' ह्यांमध्ये असलेला भेद व्यक्त करणे मराठीला शक्य होत नाही. कारण ह्या दोन्हींसाठी मराठीत 'अध्यक्ष' हा एकच शब्द उपलब्ध आहे. मराठीवरील 'आक्रमणा'बद्दल तक्रार करणाऱ्या पत्रांत कळकळ असली तरी, भाषेचा विकास, भाषेतील शब्द घडण्याची प्रक्रिया इत्यादींबद्दलची जाणीव त्यांतून व्यक्त होत नाही. तेव्हा त्या पत्रलेखकांना भाषाविषयक जाणीव आहे असे म्हणावयाचे की नाही असे म्हणावयाचे ?

आधुनिक युगातील आपण बहुसंख्य लोक बहुभाषिक आहोत आणि आपल्या बोलण्यात एकापेक्षा अधिक भाषांचा उपयोग होणेही अपरिहार्य असते. चित्रवाणीवरील मुलाखती, मालिका बघताना हे आपल्याला दिसून येते. 'कोडस्विचिंग' म्हणजे बोलताना एका भाषेतून दुसऱ्या भाषेत (किंवा भाषांत) शिरणे व परतणे ही बहुभाषिकतेची अपरिहार्य परिणती आहे; पण हे कोणत्या क्षेत्रांत व संदर्भात स्वीकारायचे आणि कोणत्या संदर्भात नाकारायचे ह्याबद्दलची जाणीव समाजात आहे असे दिसत नाही. खासगी व अनौपचारिक संदर्भात 'कोडस्विचिंग' स्वीकारावे पण औपचारिक भाषणात वा लेखनात ते नाकारावे ह्याचे भान आपल्याला नसते आणि त्यामुळे सर्वसाधारणपणे सर्वच 'कोडस्विचिंग'बद्दल आपण तक्रार करतो आणि त्याचा दोष इंग्रजी माध्यम, परप्रांतीयांचा वरचष्मा इत्यादींपैकी कुणालातरी देऊन मोकळे होतो.

भाषाविषयक आपली जाणीव किती गैरसमजावर आधारलेली आहे, हे शिक्षणाच्या माध्यमाबाबतच्या वादंगावरून दिसून येते. इंग्रजी चांगले यावे म्हणून इंग्रजी माध्यमामध्ये मुलांना ढकलणे, इंग्रजी माध्यमाला जास्त 'प्रतिष्ठित' मानणे इत्यादी प्रकार फार मोठ्या प्रमाणावर घडत असल्याचे आपल्याला दिसते. महाराष्ट्राच्या राजधानीत, मुंबईत, मराठी माध्यमांच्या शाळा विद्यार्थ्यांच्या अभावी बंद पडत आहेत. मराठी माध्यमातून शिकलेल्या चौथ्या इयत्तेतील विद्यार्थ्यांना मराठीही वाचता येत नाही असे दृश्य शेकडो शाळांतून दिसत असताना, पहिल्या इयत्तेपासून इंग्रजी शिकवायला आपण सुरुवात केली आहे. ह्या बाबतीत आपण कोणत्या माध्यमातून किंवा कोणती भाषा शिकवतो ह्यापेक्षा आपण जे देतो आहोत त्याची गुणवत्ता काय आहे  ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे, ह्याचे भान सरकारला व समाजाला असल्याचे दिसत नाही. एकच काय पण तीन-चार भाषाही लहान मुले सहजपणे शिकू शकतात हे खरे आहे. पण



अनुक्रमणिका

त्यासाठी शिक्षक, अध्यापनपद्धत, पाठ्यपुस्तक, शाळेतले व घरातले वातावरण ह्या सर्वांचा सुजाण सहभाग असावा लागतो, हे मात्र आपण समजून घेत नाही.

समाजाची भाषाविषयक जाणीव व्यक्त होण्याचे आणखी एक क्षेत्र म्हणजे प्रमाणभाषा, व्याकरण, शुद्धलेखन ह्यांबद्दलचे अज्ञानावर आधारलेले आपले गैरसमज. 'प्रमाणभाषे'ला साडेतीन टक्क्यांची भाषा ठरवून मोडीत काढण्याच्या प्रकारामुळे भाषेला प्रदेश, काळ, जात, व्यवसाय ह्यांची बंधने पडतात आणि मराठीचा ज्ञानभाषा म्हणून होणारा विकास खुंटतो, ह्याची जाणीव समाजाला पुरेशा गांभीर्याने झाली आहे, असे दिसत नाही. विद्यार्थ्यांना, अगदी आदिवासी विद्यार्थ्यांनाही, त्यांच्या मातृभाषेतून शिक्षण द्यावे, हे खरे. पण ते किती वर्षे आणि कोणत्या इयत्तेपर्यंत ? त्या विद्यार्थ्यांमध्ये प्रमाणभाषेतून ज्ञान ग्रहण करण्याची क्षमता निर्माण झाल्याशिवाय त्यांची प्रगती होणार नाही, ह्याचे भान समाजाने बाळगायला हवे. शुद्धलेखनाबद्दलही टोकाची मते आढळतात तीही बुद्धिभेदामुळेच ! भाषा म्हणजे फक्त शुद्धलेखन नव्हे हे जसे खरे आहे, तसेच शुद्धलेखनाला मोडीत काढण्याने फार पुरोगामीपणा साधतो, असे नाही. शुद्धलेखन ही बऱ्याच अंशी एक सोय आहे आणि त्याच्यात एकवाक्यता असणे सर्वांच्याच फायद्याचे ठरते, हे विसरून चालणार नाही. सर्वांच्या सोयीसाठी ते सुलभ केले तर भाषा काही कोसळून पडत नाही ही जाणीवही अनेकांकडे नाही, असे दिसते. आपल्या भाषाविषयक जाणिवेत शैलीचीही उपेक्षा होत असल्याचे दिसते. किंबहुना 'शैली'बद्दल अनेक गैरसमज आपल्या भाषाविषयक जाणिवेत दृढमूल झाले आहेत. 'शैली' म्हणजे अनुप्रास, शैली म्हणजे संस्कृतोद्‌भव शब्द, शैली म्हणजे पल्लेदार वाक्ये, शैली म्हणजे सुभाषितवजा सार्वकालिक सत्य सांगणारी (किंवा, निदान तसा आव आणणारी) वाक्ये अशा अनेक गैरसमजुती समाजामध्ये आढळतात. त्यामुळे शैली ही 'कमवावी' लागते; लेखनविषय, लेखननिमित्त व वाचक ह्या घटकांचा शैलीशी काही संबंध नसतो, असे सर्वसाधारणपणे समजले जाते. त्यामुळे खोट्या, कृत्रिम शैलीतील लेखनाला प्रतिष्ठा दिली जाते आणि भाषाविषयक जाणीव क्षीण होते. त्यामुळे नव्याने लिहू लागलेल्या किंवा लिहू इच्छिणाऱ्याला लेखकांना चांगले व वाईट लेखन ह्यांत फरक करता येत नाही आणि अनुकरणाचा बडिवार माजतो. 'अस्सल' व 'नक्कल' ह्यांमधील भेदरेषा पुसट होत जाते.

मराठीप्रमाणेच इतर भाषांविषयीचीही आपली जाणीव उथळ आहे. 'अवघड' शब्द वापरता येणाऱ्या वक्त्याचे किंवा लेखकाचे 'इंग्रजी फार चांगले आहे' असे आपण समजतो. शब्दाचा अर्थ, शब्दाची जडणघडण, शब्दाचे वजन ह्यांची आपल्याला पुरेशी जाणीव नसते. त्यामुळे निष्काळजीपणाने वापरलेल्या भाषेबद्दल आपण तक्रार करीत








नाही. मराठीप्रमाणे इंग्रजी वृत्तपत्रांतही अनेक चुका असतात. स्पेलिंगपासून व्याकरणापर्यंत सर्व स्तरांवर गलथानपणा असतो, पण तो आपल्याला जाणवत नाही. क्वचित जाणवला तरी 'चालायचंच' म्हणून आपण ती बाब सोडून देतो. त्यामुळे ती भाषा नेहमी वाचाव्या लागणाऱ्या वाचकांच्याही भाषावापरात ढिलेपणा येतो आणि आपल्या भाषाविषयक जाणिवेत हीण मिसळू लागते. नेमकेपणाची, अचूकतेची अपेक्षा करणे हास्यास्पद ठरू लागते.

भाषाविषयक कौशल्ये आत्मसात केलेल्या व्यक्तींबद्दल पूर्वी आदर बाळगला जाई. समाजाच्या सांस्कृतिक व सामाजिक जीवनात अशा व्यक्तींना मानाचे स्थान असे. पण गेल्या तीन-चार दशकांत हे चित्र बदलत गेले. आता प्रतिष्ठा मिळते ती पैशाला, सत्तेला. त्यामुळे भाषिक कौशल्ये आत्मसात करण्याची निकड वाटेनाशी झाली आहे. भाषा कितीही ढिसाळ असली तरी फारसे बिघडत नाही, अशी समजूत झाल्यामुळे विद्यार्थी भाषांकडे उपेक्षेने पाहू लागले आहेत.

अधिकाधिक गुण मिळवण्याच्या स्पर्धेवर विद्यार्थ्यांच्या सर्जनशीलतेला वाव देण्याऐवजी पाठांतरावर, साचेबंद भाषेत उत्तरे लिहिण्यावर भर दिला जात आहे. माणसाची सर्जनशीलता मुख्यत: भाषेतूनच व्यक्त होत असते. पाठ्यपुस्तकांवरील प्रश्नांची उत्तरे असोत वा निबंध, किंवा आकलन-उताऱ्यावरील प्रश्नांची उत्तरे असोत, ती विद्यार्थ्यांनी 'स्वत:च्या' भाषेत लिहावीत असा आग्रह धरण्याऐवजी, म्हणजेच विद्यार्थ्यांच्या सर्जनशीलतेला उत्तेजन देण्याऐवजी, विद्यार्थ्यांनी ठरावीक शब्दांत, ठरावीक वाक्यांतच उत्तरे लिहावीत असे शिकवले गेल्यामुळे, विद्यार्थ्यांची भाषा आणि भाषेतूनच आविष्कृत होऊ शकणारी विचारशक्ती लुळीपांगळी होत आहे. समाजाच्या बौद्धिक व सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीने ही परिस्थिती धोकादायक आहे.

आपली भाषाविषयक जाणीव उथळ, लुळीपांगळी होण्याचे आणखी एक कारण म्हणजे शालेय व सार्वजनिक ग्रंथालयांची व वाचनालयांची केविलवाणी स्थिती. भाषेच्या अध्यापनाला मर्यादा असतात. खरे पाहता भाषा आतून 'उमजावी' लागते. केवळ शिकवण्यातून अशी उमज निर्माण करणे जवळजवळ अशक्य असते. अध्यापनाला वाचनाची जोड असावी लागते. वाचनातून शब्दसंपत्ती वाढते, नवीन संकल्पना व विचार विद्यार्थ्यांच्या कवेत येतात. (येथे 'नवीन' म्हणजे 'विद्यार्थ्यांना माहीत नसलेल्या' असा अर्थ अभिप्रेत आहे.) त्यामुळे त्याची बौद्धिक व भावनिक वाढ होते, आणि त्यामुळे त्याची भाषिक सामग्रीही सखोल व विस्तृत होत जाते. अशा रीतीने भाषा व बुद्धी एकमेकींना पूरक ठरतात, त्यांच्यातील आंतरक्रियेने दोन्हींचाही विकास होतो. परंतु आजकाल फारशी वाचनालये उरलेली नाहीत आणि ग्रंथालयांतील ग्रंथ

व त्यांचे व्यवस्थापन ह्यात गंभीर उणिवा निर्माण झाल्या आहेत. विद्यार्थ्यांना अवांतर वाचन करायला वेळच नसतो. 'क्लास', शिकवण्या, घटकचाचण्या, अशा चक्रांत विद्यार्थी अडकला आहे. ग्रंथालयांना मिळणारे अनुदान कमी होत गेले आणि ग्रंथखरेदी आटत गेली. ह्या परिस्थितीत वाचनासारखा स्वयंशिक्षक मागे पडत आहे. सार्वजनिक ग्रंथालयांची स्थिती ह्यापेक्षा भिन्न नाही. स्वस्त, भरपूर वटणावळ असणारी पुस्तके खरेदी केली जातात. त्यामुळे विविध ज्ञानक्षेत्रातील विविध ग्रंथ विकले जात नाहीत; परिणामतः ते प्रकाशित होणेही अवघड होत जाते. वास्तविक पाहता नगरांत, नगरांच्या प्रत्येक उपनगरात, ग्रामीण भागात ग्रंथालये हवीत, वाचनालये हवीत; त्यांमधील ग्रंथसंग्रहात सातत्याने भर पडायला हवी. शिवाय ह्या ग्रंथालयांतील पुस्तके वाचण्यासाठी, घरी घेऊन जाण्यासाठी कोणतेही शुल्क आकारले जाऊ नये, वाचनात अडथळा आणणारा प्रत्येक घटक दूर करायला हवा. वाचन-भाषाविकास-व्यक्तिमत्त्व विकास अशी साखळी असते. ह्या साखळीतील प्रत्येक कडी सशक्त असायला हवी. पण आपला समाज, आपले सरकार ह्या पायाभूत गोष्टीकडे दुर्लक्ष करते. रस्ते, पाणी, वीज, परिवहन या पायाभूत सुविधा उपलब्ध असल्याशिवाय औद्योगिक विकास होणे शक्य नसते, त्याचप्रमाणे ग्रंथालये, वाचनालये ह्यांची सुविधा असल्याशिवाय भाषिक व बौद्धिक विकास होणे शक्य नाही. ह्या संदर्भात मुंबईत सुरू झालेला 'मित्र मराठी शाळांचे' हा उपक्रम अनुकरणीय आहे. मराठी शाळांना पूरक ठरतील अशा सुविधा दिल्यास मराठी शाळांतील 'न्यून ते पुरते' होईल, आणि त्या विद्यार्थ्यांच्या विकासात महत्त्वपूर्ण भूमिका बजावू शकतील, असा विश्वास ह्या उपक्रमाच्या मुळाशी आहे. ह्या उपक्रमातून व्यक्त होणारी भाषाविषयक जाणीव सखोल व समजूतदार आहे.

शाळेत फक्त भाषेचे शिक्षक भाषा शिकवतात असे नाही, तर इतरही सर्व विषयांचे शिक्षक आपल्या विषयांबरोबर भाषाही शिकवत असतात, हे विसरून चालणार नाही. त्यामुळे त्या शिक्षकांच्यामध्ये भाषाविषयक सजग जाणीव निर्माण करणे अगत्याचे आहे. शाळांतील अभ्यासेतर उपक्रमांतही भाषा महत्त्वाची भूमिका बजावत असते. नाटक, वक्तृत्व, सुगमसंगीत ह्यांत भाषेला महत्त्वाचे स्थान असते. हस्तलिखित, हस्ताक्षर-स्पर्धा, पाठांतर-स्पर्धा अशा उपक्रमांतून विद्यार्थ्यांच्या सर्जनशीलतेला वाव व उत्तेजन देता येते. ह्या सर्व उपक्रमांत विद्यार्थ्यांशी चर्चा करणे, निरोगी स्पर्धा रुजवणे, वाचनाची जोड देणे ह्यांच्याद्वारे विद्यार्थ्यांमध्ये भाषाविषयक जाणीव निर्माण करणे शक्य असते. रोजच्या वृत्तपत्रातील पहिले पान, संपादकीय पान व क्रीडाविषयक पान विद्यार्थ्यांकडून वाचून घेणे, फळ्यावर लिहून घेणे हेही फार परिणामकारक ठरते. आपल्याला आवडलेली वाक्ये, परिच्छेद लिहून घेण्याची सवय विद्यार्थ्यांना लागावी,

ह्यासाठीही प्रयत्न व्हायला हवेत. शक्य असेल तेव्हा ती वाक्ये, परिच्छेद का आवडतात याचीही विद्यार्थ्यांबरोबर चर्चा करावी. त्यामधून भाषासौंदर्य, विचारसौंदर्य ह्यांची जाणीव विद्यार्थ्यांना होऊ शकते. आणि हे उपक्रम फक्त भाषाशिक्षकांनीच करावेत असे नाही; सर्वच शिक्षक या उपक्रमात सहभागी झाले तर विद्यार्थ्यांना त्यांच्याबद्दल उत्सुकता व आस्था निर्माण होईल आणि त्यांच्या दृष्टिकोणात व जीवनात क्रांती होईल.

या सर्व विवेचनातून एक मुद्दा अधोरेखित करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या जीवनातून भाषा वेगळी काढता येत नाही. आपले जीवन आपण जितके सुजाण, अर्थपूर्ण व सखोल बनवू तितकी आपली भाषाविषयक जाणीव सूक्ष्म, सखोल व सुजाण बनते, हे लक्षात ठेवणे व त्यानुसार आचरण करणे, हाच आजच्या भाषाविषयक अनास्थेवरचा रामबाण उपाय आहे.

[ *हा लेख कासेगाव एज्युकेशन सोसायटीच्या 'तपस्या' ह्या वार्षिकात प्रथम प्रकाशित झाला* ] ■

**प्र. ना. परांजपे**

## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन "भाषा आणि जीवन"ला हवे आहे : मराठी व अन्य देशी-विदेशी भाषा, भाषाविज्ञान, भाषांतर, संशोधन, शैली, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय इ. धोरणे, 'भाषा आणि जीवन'मधील लेखांसंबंधीच्या प्रतिक्रिया, पानपूरके.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :

(अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.

(आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावी.

(इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व ( इष्ट वाटल्यास ) दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.)

(उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.








अनुक्रमणिका

# चिरस्मृत डॉ. देवीसिंग चौहान

**कल्याण काळे**

बरंचसं आयुष्य राजकारणात घालवूनही ज्यांनी आपली प्रतिमा स्वच्छ ठेवली, गरीब शेतकरी कुटुंबात जन्म घेऊनही ज्यांनी सरस्वतीची उपासना करण्यात आणि संस्कृत, फार्सी यासारख्या भाषांच्या व्यासंगात आपलं आयुष्य वेचलं, आजपर्यंत विद्वानांनी ज्या क्षेत्रांकडे दुर्लक्ष केलं, त्या संशोधनाच्या अक्षुण्ण प्रदेशात वाटचाल करून तेथे स्वनामाचे यशःस्तंभ उभारले त्या श्री. देवीसिंगजी चौहान याचं १० डिसेंबर २००४ रोजी लातूर येथे निधन झालं.

त्यांचा जन्म २ मार्च १९११ रोजी मराठवाड्यातील त्यावेळच्या उस्मानाबाद जिल्ह्यातील औसा तालुक्यातील नागरसोवा या छोट्या गावी एका गरीब शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचं संपूर्ण नाव धोंडूसिंग व्यंकटसिंग चौहान. गुरं राखण्याचं काम करत करतच त्यांचं शिक्षण सुरू झालं. लहानपणापासूनच बुद्धी चौकस होती. बंदुकीच्या नळीत दारू (स्फोटक मसाला) ठासून भरून तिचा बार कसा उडवतात, हे त्यांनी पाहिलं होतं. ते पाहून त्यांनी एरंडीचा पोकळ वासा घेऊन त्यात दारू भरली आणि ती पेटवून बार काढण्याचा प्रयत्न केला. झालेल्या अपघातात सर्व तोंड भाजून निघालं. त्यातून ते यथावकाश बरे झाले; पण चेहऱ्यावरचे हे भाजल्याचे वण अखेरपर्यंत कायम राहिले. औशाच्या शाळेतून सातवीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते पुढील शिक्षणासाठी हिप्परगा येथील स्वामी रामानंद तीर्थांच्या राष्ट्रीय शाळेत आले. तेथेही ते आपल्या उत्साही आणि धाडसी स्वभावामुळे गुरुजनात आणि विद्यार्थीवर्गात लोकप्रिय झाले. त्यांचे एक शिक्षक अनंतरावकाका ओढ्याच्या पुरात वाहून जात असता त्यांनी पुरात उडी घेऊन त्यांना वाचवलं होतं. या शाळेत ध्येयनिष्ठा, राष्ट्रभक्ती यांचे संस्कार करणारे गुरुजन त्यांना भेटले. स्वामी रामानंदतीर्थ या त्यागी देशभक्ताच्या सहवासात ते आले. या शाळेनं त्यांना आयुष्याची शिदोरी दिली. तेथून ते १९३१ साली मुंबई विद्यापीठाची मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. या अगोदरच्या वर्षी ते याच परीक्षेत गणितात कमी गुण मिळाल्यामुळे अनुत्तीर्ण झाले होते. तेव्हा त्यांनी



अनुक्रमणिका








दृढनिश्चयपूर्वक गणित विषयाचा मुळाशी जाऊन कसून अभ्यास केला. आणि पुढील वर्षी मुंबई राज्यात गणित विषयात तिसरा क्रमांक मिळवला. गणिताबद्दल निर्माण झालेल्या या गोडीमुळेच त्यांनी पुढे बी.ए.लाही गणित हाच विषय निवडला. १९३८ साली ते मुंबई विद्यापीठाचे बी.ए.(ऑनर्स) झाले. त्यानंतर पुणे येथील गोखले इन्स्टिट्यूटमध्ये त्यांनी एम.ए.चा अभ्यास सुरू केला. त्याच वेळी पुणे येथून प्रसिद्ध होऊ लागलेल्या आ.कृ. वाघमारे यांच्या मराठवाडा साप्ताहिकातही ते उपसंपादक म्हणून काम करत होते. गोखले इन्स्टिट्यूटमध्ये असतानाच त्यांनी डॉ. सोहोनी यांच्या सहकार्याने 'फ्यूडल ऑप्रेशन इन् हैदराबाद' ही हैदराबाद राज्यातील अन्याय्य कर आकारणी पद्धतीवर प्रकाश टाकणारी पुस्तिका लिहून प्रकाशित केली. १९३८ साली हैदराबाद स्टेट काँग्रेसच्या सत्याग्रहात ते सहभागी झाले. त्यांनी उस्मानाबाद जिल्ह्यातील कार्यकर्त्यांची संघटना बांधण्याचं कार्य केलं. सन १९४१मध्ये त्यांनी नागपूर विद्यापीठाची एल्‌एल्.बी.ची परीक्षा दिली आणि ते उमरगा येथे वकिलीचा व्यवसाय करू लागले. या सुमारास त्यांनी स्वत:चे धोंडूसिंग हे नाव बदलून देवीसिंग असं करून घेतलं. त्यांची वकिली जोरात चालू होती, पण हिप्परग्याच्या शाळेनं दिलेले समाजसेवेचे, राष्ट्रसेवेचे संस्कार त्यांना स्वस्थ बसू देत नव्हते. आपल्याला मिळालेलं हे बाळकडू पुढील पिढीला दिलं पाहिजे, या जाणिवेने त्यांनी आपल्या मित्रांच्या सहकार्याने 'भारत विद्यालय' ही खासगी शाळा सुरू केली. या शाळेत विद्यार्थ्यांना अभ्यासाच्या विषयाबरोबर समकालीन देशस्थितीची आणि हैदराबाद संस्थानात आणि संस्थानाबाहेर चाललेल्या स्वातंत्र्यलढ्याची माहितीही देण्यात येऊ लागली. काही वर्षांनी या शाळेचं उच्च माध्यमिक शाळेत रूपांतर झालं. त्या वेळी शिक्षणमहर्षी बाबासाहेब परांजपे यांच्या सूचनेवरून त्यांनी आपली चांगली चालणारी वकिली सोडली आणि ते या शाळेचे मुख्याध्यापक झाले. या नोकरीत त्यांना दरमहा अवघा २०० रु. असा पगार मिळत असे. तेव्हापासून 'गुरुजी' ही उपाधी त्यांना कायमची चिकटली. पुढे राजकारणातील सहकारीही त्यांना गुरुजी म्हणूनच संबोधू लागले. मराठवाड्यातल्या मराठा समाजाला जातीच्या संकुचित विचारांपासून चार हात दूर ठेवण्याचं कार्य त्यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी केलं. त्यामुळे हैदराबाद स्टेट काँग्रेसमध्ये देवीसिंगजींचं वजन वाढलं. १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारताचा पहिला स्वातंत्र्यदिन साजरा केला म्हणून निजाम सरकारने देवीसिंग चौहान, श्रीनिवास मुगळीकर व श्री. अहंकारी यांना उस्मानाबाद येथील कारावासात डांबून ठेवलं. श्री. देवीसिंगजी आणि श्री. अहंकारी यांनी उस्मानाबादच्या तुरुंगातून पळून जाण्याचा प्रयत्न केला. श्री. अहंकारी त्या प्रयत्नात यशस्वी झाले; पण श्री. देवीसिंगजींना








मात्र त्यात अपयश आलं. तुरुंगवासात राजकीय आणि आर्थिक प्रश्नांचा ऊहापोह करणाऱ्या अनेक ग्रंथांचं त्यांनी वाचन केलं.

पोलिस ॲक्शननंतर ते कारावासातून मुक्त झाले. १९४९ ते १९५२ या काळात मराठवाडा प्रदेश कॉंग्रेसचे चिटणीस म्हणून त्यांनी काम पाहिलं. १९५२मध्ये देशात सर्वत्र निवडणुका झाल्या. त्या वेळी ते औसा मतदार संघातून आमदार म्हणून निवडून आले. त्यानंतर हैदराबाद राज्याच्या पहिल्या मंत्रिमंडळात त्यांचा समावेश झाला. १९५२-५४ या काळात ते सहकार व शेती खात्याचे मंत्री होते. मराठवाड्याच्या महाराष्ट्रातील विलीनीकरणाच्या संदर्भात जो नागपूर करार झाला, त्यामध्ये देवीसिंगांनी मराठवाड्याचं प्रतिनिधित्व केलं. मुंबई राज्याच्या दुसऱ्या १९५७च्या मंत्रिमंडळात उपमंत्री म्हणून त्यांची निवड झाली. भाऊसाहेब हिरे आणि यशवंतराव चव्हाण यांच्यातील वितुष्टामध्ये देवीसिंगांनी हिऱ्यांचा पक्ष घेतल्यामुळे ते मंत्रिमंडळातून वगळले गेले. पुढे १९६२च्या निवडणुकीत त्यांच्याच औसा मतदार संघातच पराभूत झाल्यामुळे ते राजकारणातून बाहेर पडले आणि आपल्या आवडत्या संशोधन कार्याकडे वळले.

तसं पाहिलं तर १९५७पासूनच त्यांनी संशोधनात लक्ष घालायला सुरुवात केली होती; आता त्यांनी आपलं सर्व लक्ष संशोधनावरच केंद्रित केलं. त्यानंतर १९६४ ते १९७०या काळात त्यांची महाराष्ट्र राज्याच्या लोकसेवा आयोगाचे सदस्य म्हणून नेमणूक झाली. तसेच त्यांनी स्थापन केलेल्या भारत शिक्षण संस्थेचं अध्यक्षपदही त्यांनी काही काळ सांभाळलं. पण वयाची ८० वर्षे उलटेपर्यंत संशोधन हेच त्यांचं आवडतं क्षेत्र होतं. ते आपल्या संशोधनासंबंधी लेख लिहीत राहिले. भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्थेचं वार्षिक, डेक्कन महाविद्यालयाची पत्रिका, भारत इतिहास संशोधक मंडळाची पत्रिका, इंडियन लिंग्विस्टिक्स, अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेचं नियतकालिक, इतिहास परिषदेचं नियतकालिक, रॉयल एशियाटिक सोसायटीचं नियतकालिक, निरनिराळ्या विद्यापीठांची संशोधनपर नियतकालिके, मुंबई मराठी संशोधन पत्रिका, नवभारत, प्रतिष्ठान, समाज प्रबोधन पत्रिका, युगवाणी, साधना, महानुभाव पत्रिका, महाराष्ट्र साहित्य पत्रिका इ. नियतकालिकातून त्यांचे लेख सातत्याने येत राहिले. त्यांनी जवळजवळ २५० संशोधनपर लेख लिहिले. त्यातील एकेका विषयावरचे लेख संग्रहरूपाने त्यांनी प्रसिद्ध केले. त्यांचे 'मराठी आणि दक्खिनी हिंदी', 'भारत ईराणी संश्लेष' भाग १ व २, 'शूलिक आणि प्राकृत', 'अंडरस्टॅंडिंग ऋग्वेद' इ. प्रसिद्ध ग्रंथ हे लेखसंग्रहच आहेत. याशिवाय त्यांनी काही प्राचीन ग्रंथ संपादित केले. काही फार्सी उर्दू ग्रंथांचे अनुवाद केले. अशी एकूण ११ ग्रंथांची निर्मिती केली. सन १९८९मध्ये त्यांनी आपल्या मित्रांच्या सहकार्याने लातूर येथे 'वेदप्रतिष्ठान' ही

संस्था स्थापन केली आणि वेदग्रंथांचा पायाशुद्ध अभ्यास करण्याची सोय उपलब्ध करून दिली. वयाची ऐंशी वर्षं उलटल्यानंतर त्यांच्या लेखनाचा झंझावात मंदावला. सन १९९९ साली म्हणजे त्यांच्या वयाच्या ८८व्या वर्षी त्यांना अर्पण केलेला 'डॉ. देवीसिंग चौहान गौरव ग्रंथ' प्रसिद्ध झाला. जवळजवळ ३८ विद्वानांनी या गौरवग्रंथासाठी लेखन केलं असून वेदापासून ते बारवस्थापत्यापर्यंत अनेक विषयांवरचे लेख त्यात आले आहेत. त्यांच्यासारख्या विद्याप्रेमी, व्यासंगी विद्वानाच्या व्यासंगाचा, संशोधनकार्याचा औचित्यपूर्ण सत्कार या गौरवग्रंथाच्या निर्मितीने झाला असंच म्हणावं लागेल. त्यानंतर त्यांची तब्येत ढासळू लागली. स्मृती क्षीण झाली. आणि शेवटी १० डिसेंबर २००४ रोजी वयाच्या ९४व्या वर्षी त्यांची प्राणज्योत मालवली.

देवीसिंगजी बहुभाषाकोविद होते. मराठी, हिन्दी, उर्दू, फारसी, संस्कृत, इंग्रजी या भाषांवर त्यांचं असामान्य प्रभुत्व होतं. या भाषांतील संशोधनपर लेखनाशी त्यांचा जवळून परिचय होता. आचार्य वि.प्र. लिमये यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी ऋग्वेदाचा सखोल अभ्यास केला होता. ऋग्वेदाकडे ते धार्मिक ग्रंथ म्हणून नव्हे, तर आर्य संस्कृतीच्या उदयकाळातील पाऊल खुणांचा दस्तऐवज म्हणून पाहात होते. संस्कृतवरही त्यांचं चांगलं प्रभुत्व होत. तिच्यात ते पद्यबद्ध रचनाही करू शकत असत. उर्दू, फारसी या भाषांचाही त्यांचा व्यासंग दांडगा होता. यामुळेच भारतविद्येच्या अभ्यासकांच्या नजरेतून सुटलेली अनेक नवीन नवीन संशोधनक्षेत्रं त्यांना उपलब्ध झाली.

त्यापैकी दक्खिनी हिंदी हा एक महत्त्वाचा विषय होता. दक्खिनी हिंदी ही उत्तरेकडील दिल्लीच्या आसपासच्या प्रदेशात मुळात बोलली जाणारी एक बोली. मुसलमानी सत्ता तिथे स्थिर होताच तेथील अधिकाऱ्यांनी सामान्य प्रजेशी संवाद साधण्यासाठी तिचाच अंगीकार केला. शासकीय कामकाज फार्सीमधून चालत असले तरी जनसंपर्कासाठी हीच बोली वापरली जात होती. एवढंच की मुस्लिमांच्या बोलण्यात फार्सी शब्दांचे प्रमाण अधिक असे. मुस्लिम सत्तेबरोबर ही खडी बोली सर्वत्र पसरली. ती प्रथम बोली अवस्थेत होती. कालांतराने तिच्यात साहित्यनिर्मितीही होऊ लागली. साहित्यभाषा म्हणून तिचा विकास करण्याचं श्रेय मुख्यत: दक्षिणी राज्यांनाच जातं. मुसलमान राज्यकर्ते आणि स्वमतप्रचारासाठी आलेले सूफी संत यांची ती संपर्कभाषा होती. सूफी संतांनी आपली ग्रंथरचना तिच्यातच केली. बहामनी राज्यातील काही सुलतानही काव्यरचना करत. त्यांनी ती या बोलीतच केली आहे. ही खडी बोली ज्या ज्या प्रांतांत गेली तिथल्या तिथल्या स्थानिक बोलींचा थोडाफार प्रभाव तिच्यावर पडलाच. पण दक्षिणेत मराठी बोलीचा प्रभाव तिच्यावर सर्वाधिक पडला. याच बोलीला दक्खिनी बोली या नावाने ओळखलं जातं. सन १८०५पर्यंत खुद्द मुस्लिम लेखक

तिचा हिंदुई/हिंदी या नावाने उल्लेख करत असत. ब्रिटिशांच्या शासनात फारशी लिपीत लिहिली जाणारी ती उर्दू आणि देवनागरी लिपीत लिहिली जाणारी ती उर्दू आणि देवनागरी लिपीत लिहिली जाणारी ती हिंदी असा भेद निर्माण करण्यात आला. त्यानंतर ही उर्दू मुस्लिमांच्या अस्मितेची बाब ठरली आणि तिच्यात फारसी, अरबी शब्दांचा भरणा वाढू लागला. पण १८ व्या शतकाअखेरपर्यंतचे दक्खिनी हिंदीतील साहित्य पाहता त्या भाषेवरील मराठीचा प्रभाव स्पष्ट दिसतो. मराठीतील सकर्मक क्रियापदांच्या भूतकाळी प्रयोगात त्यांच्या कर्तृपदाला लावण्यात येणारा 'ने' हा प्रत्यय दक्खिनी हिंदीने घेतला आहे. हा प्रत्यय उत्तरेकडील खडी बोलीत लिहिलेल्या 'कुतबशतक' या ग्रंथात नाही. पण नामदेवांच्या मुखबानीत तो आहे. मराठीतील कित्येक शब्द दक्खिनी हिंदीत आढळतात, त्याप्रमाणे वाक्प्रचार आणि म्हणी यांचीही दक्खिनी हिंदीने मराठीतून उसनवारी केलेली आहे. इतकेच काय, दक्खिनी हिंदीच्या साहित्यातील सांस्कृतिक प्रतिमा या बव्हंशी भारतीय संस्कृतीतूनच आलेल्या आहेत. दक्खिनी हिंदीने महाराष्ट्र, आंध्रप्रदेश, कर्नाटक या राज्यांत प्रवेश मिळवला असला तरी मराठीखेरीज तेलुगू, कन्नड या इतर दाक्षिणात्य भाषांचा तिच्यावर फारसा प्रभाव पडलेला नाही. दक्खिनी हिंदी ही तेराव्या शतकापासून ते एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत भारताची संपर्क भाषा म्हणून नांदलेली आहे. ती आजच्या हिंदी आणि उर्दू या भाषांची जनकभाषा आहे. ती भारतीय भाषा असून मराठीशी सगोत्र अशी आर्य भाषा आहे. मात्र तिच्या साहित्यिक विकासाचे श्रेय मुस्लिमांनाच दिले पाहिजे. मुल्ला नुस्रती, गवासी, वजही, अमीर खुस्रो यांसारख्या श्रेष्ठ साहित्यिकांनी तिच्यात श्रेष्ठ कलाकृती निर्माण केल्या आहेत.

श्री. देवीसिंग चौहानांचं दक्खिनी हिंदी संबंधीचं हे संशोधन फार मोलाचं आहे. उर्दू फार्सीच्या अभिमान्यांनी तिच्याकडे तुच्छतेनेच पाहिलं होतं. ती जवळजवळ १९३० पर्यंत अभ्यासकांकडून दुर्लक्षितच राहिली होती. वि.का. राजवाडे, डॉ. अब्दुल हक इ० विद्वानांनी तिची थोडीफार ओळख करून दिली होती. पण मराठीत तरी निदान तिचा साग्रसंगीत परिचय करून देण्याचं श्रेय श्री. देवीसिंग चौहान यांच्याकडेच जातं. त्यांनी तिच्या संदर्भात अनेक लेख लिहिले. ते सर्व त्यांच्या 'मराठी आणि दक्खिनी हिंदी' या ग्रंथांत समाविष्ट आहेत. या ग्रंथाला भाषा विभागातील सर्वोत्कृष्ट ग्रंथ म्हणून महाराष्ट्र राज्य पारितोषिक मिळालं होतं.

त्यांच्या संशोधनाचा दुसरा विषय म्हणजे भारत ईराण यांच्या संबंधासंबंधीचा होय. यातील ईराण सध्याचा इराण देश नसून ते एक उपभाषाकुल आहे. त्यात समाविष्ट होणाऱ्या म्हणजे सोग्दिया (चूलिक) देशाच्या सुग्द चूलिक, शूलिक, खोतन



अनुक्रमणिका

देशाच्या खोतनी, शक, अफगाणिस्तानची पश्तो, बलुचिस्तानची बलुची या उपभाषांचा प्रामुख्याने समावेश होतो. या सर्व भाषांची जनकभाषा ती ईराणी भाषा आणि त्या भाषेचा प्रदेश तो ईराण देश होय, अशी व्यापक भूमिका या संकल्पनेमागे आहे. ईराण विद्या या विद्याशाखेत हीच परिभाषा वापरली जाते. भारतीय आणि ईराणी जनसमूह शतकानुशतके एकत्र नांदले. नंतर ते दुरावले. इ.स. ५०० पासून त्यांच्यात पुन्हा संबंध स्थापन झाले. कनिष्काची राजधानी पिशाचपुर येथून या पुन:संबंधाची सुरुवात झाली. ते भारत-ईराण संबंधाचं केंद्र होतं. या साम्राज्याचा परिणाम म्हणून शकादी ईराणी लोकांची सत्ता समग्र पश्चिम भारतात कमीअधिक प्रमाणात पुढे ४००-५०० वर्षे चालत राहिली. या दीर्घकालीन संबंधाचे अनेक राजकीय, भाषिक, वास्तुविषयक अवशेष या प्रदेशात विखुरलेले दिसून येतात. ईराणी भाषेतील अनेक शब्द भारताच्या जुन्या साहित्यातून आढळतात. ईराणी राजवटीची नाणी सर्वत्र आढळतात. ईराणी जीवनाच्या द्योतक अनेक वस्तू पाटलीपुत्र, कोशांबी, साची, नाशिक आदि प्राचीन स्थळी दिसून येतात. ईराणी भाषांच्या संपर्कातूनच पैशाची प्राकृतची निर्मिती झाली. या भाषेचा प्रभाव राजशेखराच्या काळापर्यंत (इ.स. ९५०) स्पष्टपणे जाणवतो. हा प्रभाव फक्त ऋणित शब्दांपुरताच मर्यादित नसून व्याकरणापर्यंत पसरलेला आहे. मराठीतील 'की' हे उभयान्वयी अव्यय ईराणी भाषेच्या संबंधातूनच मराठीत आलं असून ते मुस्लिम संस्कृतीच्या आगमनापूर्वीपासूनचं आहे, हे लीळाचरित्रातील त्याच्या प्रयोगांच्या आधारे देवीसिंगांनी स्पष्ट केलं आहे. मराठीतील दन्त्य 'च' हा या ईराणी संबंधाचीच देणगी आहे. तुकाई, तुळजाभवानी ही महाराष्ट्राची कुलदेवता ही ईराणी-पैशाच सांस्कृतिक वस्त्रप्रावरणात आपल्यासमोर उभी आहे. इसवीपूर्व अफगाणिस्तान भारताला फार जवळचा होता. पाणिनी हा अफगाण देशातला. कैकेयी, गांधारी या भारतीय राण्या मूळच्या तिथल्याच. इतकंच काय अफगान हा शब्दच भारतीयांनी घडवलेला आहे. 'इण्डिया' हा शब्द ईराणने भारताला दिला आहे. हरियाणा हे नाव 'ईराण' या शब्दाची आठवण करून देतं. काबूलच्या उत्तर व ईशान्येकडील काफिरी भाषा या प्रामुख्याने भारतीय भाषा होत. अशी या संपर्काची देवाणघेवाण आहे. 'दाती तृण धरणे', 'बाणाच्या अंतरावर' इ० वाक्प्रचार हे ईराणीतूनच भारतीय भाषांत आले. बऱ्याच मराठी शब्दांची परंपरा ईराणीच्या माध्यमातून कमी टप्प्यांची ठरते, असे त्यांनी अनेक पुराव्यांनी सिद्ध केले आहे.

हा विषय एकंदर भारतीय पुरातत्त्वशास्त्राच्या विद्याशाखेत बराच नवीन होता. मराठीत तर तो मुळीच माहीत नव्हता. देवीसिंगांनी हे नवं दालनच मराठीच्या संशोधनक्षेत्रात उघडलं. त्यांचा मुख्य भर भाषाशास्त्रीय पुराव्यांवर होता. या ईराणी

भाषांची वैशिष्ट्येही त्यांनी अचूकपणे नोंदवली आहेत. उदा० ईराणी भाषासमूहात मृदुव्यंजने नाहीत. पाची वर्गांतील मृदु व्यंजनांबद्दल त्या त्या वर्गातील कठोर व्यंजनांचा वापर हे या गटातील शूलिक भाषांचे वैशिष्ट्य आहे इत्यादी ग्रिअर्सनने अनीराणी व अभारतीय स्वरूपाच्या 'दरदीय' भाषांचा एक तिसराच गट मानला होता. देवीसिंगांनी त्या भाषा भारतीयच आहेत असं निदर्शनास आणून दिलं. पैशाचीमध्ये होणारी परिवर्तनंही संस्कृतातून न होता प्राकृतातून झाली आहेत हेही त्यांनी दाखवून दिलं. या क्षेत्रातील पूर्वविद्वानांनी केलेलं संशोधन मराठी वाचकांपर्यंत पोहोचविणे, ते करताना त्यांचे सिद्धान्त नवीन पुराव्यांनी समृद्ध करून मराठीला लावून दाखवणे, या बाबतीतील पूर्वविद्वानांच्या गैरमतांचं खंडन करणे आणि स्वत:च्या स्वतंत्र संशोधनाची भर घालणे असं देवीसिंगांच्या संशोधनाचे चतुर्विध स्वरूप आहे.'भारत ईराणी संश्लेष' (भाग १ व २), 'शूलिक आणि प्राकृत' हे ग्रंथ त्याची साक्ष देतात.

वेदवाङ्मयाकडे ते उशिरा वळले. ऋग्वेद हा त्यांच्या अभ्यासाचा आवडता विषय होता. वेद हे अपौरुषेय आहेत, त्यांच्यांत मंत्रशक्ती आहे, केवळ योग्य उच्चारणांसह त्यांचे पठन केले की, अभीष्टप्राप्ती होते असं मानणाऱ्यांपैकी ते नव्हते. आर्यांच्या भारतप्रवेशपूर्व इतिहासाचं ऋग्वेद हे एक साधन आहे असं त्यांचं मत होतं. आर्य आणि युरोपीय जनसमूह हे एकाच युरोभारतीय जनसमूहापासून उत्पन्न झाले आहेत. ते उत्तर किरगीज प्रदेशात एकसंध जनसमुदायरूपाने राहत होते. उत्तर किरघीज प्रदेश हे मर्यादित अर्थाने युरोभारतीय जनसमूहाचं मूल वसतिस्थान होय. त्या वसतिस्थानापासून त्यांची दोन मोठी निर्गमनं झाली. त्यांचा एक गट पश्चिमेकडे जाऊन युरोपातील प्रिपेट प्रदेशात स्थिर झाला. त्यांना पूर्वयुरोपीय असं म्हणता येईल. युरोभारतीयांची दुसरी टोळी आशियातील बल्ख प्रदेशाकडे आली आणि तेथे स्थिरावली. ते पूर्वार्य होत. या पूर्वार्यांनी दीर्घ कालपर्यंत या प्रदेशात वस्ती केली होती. पण पुढे त्यांचीही तीन मोठी निर्गमनं झाली. एक टोळी मध्य आशियात गेली, ती मिटानी जनसमूहाची टोळी होय. दुसरा पूर्वईराणी जनसमूह ईराणात गेला. आणि वैदिक आर्यांनी इंद्राच्या नेतृत्वाखाली भारतात प्रयाण केलं. पण या प्रयाणापूर्वी त्यांचं व पूर्व इराण्यांचं ईराणी प्रदेशात बराच काळपर्यंत एकत्र वास्तव्य होतं. त्याचे पुरावे अवेस्ता आणि ऋग्वेद या ग्रंथांतून मिळतात. बह्वंश ऋग्वेदाची निर्मिती आर्यांच्या भारतप्रवेशापूर्वी या बल्ख प्रदेशाच्या परिसरातच झाली. आर्यजन भारतात आल्यानंतर ऋग्वेदाची कुलग्रंथात मांडणी झाली, त्याचे संहितीकरण झाले आणि आजचा ऋग्वेद सिद्ध झाला, हे आधुनिक वेदाभ्यासकांचं मत त्यांनी स्वीकारलं आहे. या मताचा धागा पकडून त्यांनी ऋग्वेदातील नद्या, पर्वत आणि अन्य स्थलनामांचा

अफगाणिस्थानाच्या परिसरात शोध घेतला आणि तो निरनिराळ्या लेखांच्या रूपात मांडला. वेदात ज्यांचा उल्लेख आहे अशा कृभा, सरयु, ऊर्णावती, आर्जीकीया, सुवास्तु, क्रुमु, हरियूपीया, यव्यावती, तूर्याश, सरस्वती, दृषद्वती या नद्या अफगाणिस्थानात वाहतात हे त्यांनी दाखवून दिलं आहे. वेदातील मृजवत्, शर्यणावत्, श्वेत हे पर्वत अफगाणिस्थानातच असल्याचे ते निदर्शनास आणून देतात. ईराणी व आर्यगण हे अनेक वर्षांच्या सहजीवनानंतर विभक्त झाले. त्यामुळे त्या जनसमूहाचे आद्यग्रंथ आवेस्ता आणि ऋग्वेद यांत खूपच साम्य आहे. ईराणी आणि भारतीय सहजीवनाचं प्रतिबिंब ऋग्वेदाच्या भाषेत कसं आढळतं यावर त्यांनी बरंच संशोधन केलं आहे. त्यांचा हा अभ्यास ‘ऋग्वेद समस्या आणि उकल’ आणि ‘अंडरस्टँडिंग ऋग्वेद’ या दोन ग्रंथांत समाविष्ट झाला आहे.

स्वत: देवीसिंगांनी आपलं सर्व उत्तरायुष्य या प्रकारच्या संशोधनात वेचलं. त्यांनी अनेक ग्रंथांचं वाचन केलं; ते अनेक विद्वानांना भेटले, अनेकांशी चर्चा केल्या. विद्येच्या क्षेत्रात ते अतिशय विनम्र होते. पण अभ्यासान्ती निर्धारित झालेल्या स्वमतांवर ते ठाम होते. इतरांच्या चुका परखडपणे मांडताना ते कचरत नसत. डॉ. अब्दुल हक यांच्या संशोधनाबद्दल लिहिताना त्यांनी राजवाड्यांच्या मतांचं अनुकरण केलं असून हे एक प्रकारचं वाङ्मयचौर्यच आहे असं ते स्पष्टपणे सांगतात. राजवाड्यांचाही दक्खिनी भाषेचा अभ्यास कसा अपुरा होता हे ते सांगतात. त्यांचे स्वत:चे लेखन पूर्णपणे शास्त्रीय होते असे म्हणता येणार नाही. विशेषत: दोन भाषासमुदायांचे साम्य शोधताना त्यांनी जो व्युत्पत्तींचा आधार घेतला आहे, तो बऱ्याच ठिकाणी ताणलेला वाटतो. दोन संस्कृतींचं एकरूपत्व शोधताना भाषांचा तौलनिक अभ्यास अपरिहार्य आहे पण त्या अभ्यासात सर्वांगीणता असावी लागते. मौलिकता असावी लागते. देवीसिंगांना हे मान्य असलं तरी त्यांनी प्रस्तुत केलेला अभ्यास हा बऱ्याच अंशी शब्द-पातळीवरचाच राहिला आहे. भाषेच्या उच्चारण, व्याकरण इ. अंगांकडे त्यांना ध्यान देता आलेले नाही. राजकारणाची पार्श्वभूमी असूनही ते तत्त्वनिष्ठ राहिले, निराग्रही राहिले, विनम्र राहिले, सत्यनिष्ठ राहिले हेच त्यांचं मोठेपण होय.

■

**ए-५ प्रज्ञानगड, नवश्या मारुती गल्ली, वीटभट्टी, सिंहगड रस्ता, पुणे ४११ ०३०**

**दूरभाष २४३३५१३६**








# भाषेला मुक्त राहू दे !

द. भि. कुलकर्णी

वडील वऱ्हाडी. आई खानदेशी. बायको कोकणस्थ. माझे आयुष्य नागपूर-पुणे-कोल्हापूर-मुंबई-बनारस या शहरांत गेलेले; त्यामुळे मराठीची विविध रूपे सतत कानामनावर येत राहिली; मराठीच्या विविध बोली आणि प्रमाण मराठीची बदलती रूपे सतत जाणवत राहिली. त्यांतून शब्दांची वैकल्पिक लिंगे नेहमीच कुतूहलजनक वाटली. 'जाग' हा शब्द प्रमाण मराठीत स्त्रीलिंगी असला तरी वडील तो पुंलिंगी योजत; म्हणजे म्हणत, ''आज सकाळी मला लवकर जाग आला.'' आम्ही म्हणायचो, ''तात्या, आला नाही, आली.'' आमच्या पुस्तकी मराठीला ते जुमानत नसत. मग 'सांगाती'मध्ये 'जाग येतो तेव्हा ! अति थकव्याच्या गाढ निजेंतून' असे वाचले तेव्हा आश्चर्य वाटले नाही; म्हटले, दाहीरगाव आणि देऊळगाव ही दोन्ही गावे बुलढाणा जिल्ह्यातलीच - असे होणारच. ''ढेकर आला'' असे मी म्हटले की बायको म्हणणार, ''आला नाही, आली.'' ते लसूण की ती लसूण, ते नारळ की तो नारळ ? मी म्हणायचो, ''अरे बाबा, 'नारळ वरूते कठीण । परी अंतरी जीवन ।।' असे एका संत कवीने म्हटले आहे, माहीत नाही ?'' त्या संत कवीचे नाव मात्र मी सांगत नसे; कारण ते कदाचित माझ्या युक्तिवादाला मारक ठरले असते ! रिक्शा-ट्रक-ब्रेड-पँट-तार या शब्दांचेही तसेच; नागपूर-पुण्याचे हवामान पाहून मला त्यांचे लिंगपरिवर्तन करावे लागते. नागपुरात ब्रेड बायकी तर बाकीचे चार शब्द पुरुषी; पुण्यात ब्रेड पुरुषी तर उरलेले चार शब्द बायकी. पेन आणि टेबल या शब्दांबद्दल बोलायलाच नको - तो/ती/ते पेन, तो/ते टेबल. हे इंग्रजी शब्द आहेत म्हणून असे होते म्हणावे तर पोत (तो/ते) किरण (तो/ते) पतंग (तो/ती) - हे कसे ?

भाषेला मुक्त राहू द्यावे; ती काही व्याकरण-भाषाविज्ञान यांची बटीक नसते; ती मुक्तच असते. तिने नवनवीन शब्द घडवावेत, नवे शब्द आयात करावेत, शब्दांच्या लिंगवचनांत वैविध्य आणि वैकल्पिकता आणावी; पण असे करताना शब्दांना नवनव्या अर्थच्छटा मिळतील याची जाण ठेवावी - अशा मुक्ततेतून भाषा शब्दसमृद्ध आणि शब्द अर्थसमृद्ध झाले पाहिजेत. परभाषांबद्दल सहिष्णुता आणि मराठी बोलींबद्दल माया असली म्हणजे हे सहज शक्य होईल; अर्थात भाषाभान आणि अर्थसंवेदनशील मुद्दली असेल तरच; अहंगंड-न्यूनगंड नसेल तरच ! ■

जंतरमंतर, अमरावती मार्ग, नागपूर ४४००३३. फोन (०७१२) २५३२३१७








अनुक्रमणिका

# श्रुतयोजन: भाषेचा वारसा

नीलिमा गुंडी

आपली भाषिक-सांस्कृतिक परंपरा मुळात मौखिक स्वरूपाची होती. त्या परंपरेच्या माध्यमातूनच साहित्याचा ठेवा एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे सुपूर्द केला जात असे. एकीकडे नागर-संस्कृतीतील 'ज्ञानेश्वरी'सारखा महत्त्वपूर्ण ग्रंथ निरूपणात्मक शैलीतून श्रोत्यांसमोर सादर झालेला दिसतो, तर दुसरीकडे अनेक व्रतविधींच्या निमित्ताने लोकसंस्कृतीने जतन केलेली गीतांची परंपरा दिसते. ही श्रवण-संस्कृती आपल्या समग्र जीवनाला एकप्रकारे वेढून होती. औपचारिक शिक्षण न झालेल्या अनेकांनाही ज्ञानेश्वर-तुकारामादींची वचने या श्रवणसंस्कृतीमुळे मुखोद्‌गत झालेली दिसतात.

कविता चालीवर म्हणणे, संध्याकाळी परवचा म्हणणे, हा आमच्या पिढीतील मंडळींचा लहानपणीचा नित्यक्रम असे. या नित्य पाठांतराला किती महत्त्व असे, हे गौरी देशपांडे या विख्यात लेखिकेच्या एका आठवणीतून लक्षात येईल. त्यांनी आपल्या वडिलांविषयी - प्रा. दिनकर धोंडो कर्वे यांच्याविषयी - लिहिताना असे सांगितले आहे की रामरक्षा पाठ केल्याबद्दल त्यांना डोळे उघडमीट करणारी बाहुली घरच्यांनी बक्षीस दिली होती ! पाठांतराद्वारे भाषा, भाषेच्या लयीचे विभ्रम आणि त्यात गुंफलेले सांस्कृतिक संचित पुढच्या पिढीकडे देण्याची तेव्हाची ती एक सर्वमान्य रीत होती. त्याकाळी आकाशवाणीच्या सांस्कृतिक कार्यक्रमांनाही अनेकांच्या दिनक्रमात अगत्याचे स्थान असे. त्यामुळे लोकांच्या कानांवर संस्कार करण्यात आकाशवाणीही मोठा वाटा उचलत असे.

अजूनही आपल्याकडे व्यक्ती 'बहुश्रुत' असण्याला प्रतिष्ठा आहे. इंग्रजी भाषेत ती प्रतिष्ठा 'वेलरेड' असण्याला आहे ! पुढे इंग्रजांच्या आगमनानंतर आपल्याकडे एक सांस्कृतिक स्थित्यंतर घडले. पोपटासारखे पठण टीकाविषय झाले. श्रवण-संस्कृतीचा घटक असलेल्या पाठांतराकडे आपण पाठ फिरवली. वास्तविक श्रवण आणि स्मरण यांचे नाते घनिष्ठ मानले जाते ! श्रवणसंस्कृतीच्या ऱ्हासामुळे कानी पडलेले स्मृतीत कायम बाळगणारी, सहज संदर्भ पुरवणारी मंडळीही संख्येने कमी दिसू लागली.

ही वस्तुस्थिती आठवायचे कारण म्हणजे अलीकडे 'श्रुतयोजन' हा शब्द फारसा कानी पडत नाही; आणि वाचनातही येत नाही ! 'श्रुत' म्हणजे ऐकलेले आणि








'योजन' म्हणजे वापर. कानी पडलेली अर्थपूर्ण वचने योग्य तेथे मार्मिकपणे वापरण्याची ही रीत साहित्यात प्रतिष्ठित मानली जाते. दुर्गा भागवत, पु.ल. देशपांडे, ग.दि. माडगूळकर, शान्ता शेळके, विंदा करंदीकर यांच्या लेखनात श्रुतयोजन मोठ्या प्रमाणावर आढळते. त्यांनी कानामनात साठवलेले सांस्कृतिक संचित त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचाच भाग बनलेले होते. आजही काही साहित्यिकांनी हा वारसा जतन केलेला दिसतो.

वाचनातून स्मरणात कायम राहिलेल्या गोष्टींनीही लेखनात संदर्भसंपन्नता येते. पण 'श्रुतयोजन' हा शब्द वाचनसंस्कृतीशी निगडित नाही. कदाचित श्रवणापेक्षा वाचन हा अनुभव वैयक्तिक स्वरूपाचा ठरतो म्हणून असेल ! श्रुतयोजनात सामाजिक आवाहन अभिप्रेत असते. (उदा० सदानंद रेगे यांच्या 'ब्रांकुशीचा पक्षी', 'वेड्या कविता' इत्यादी काव्यसंग्रहांमध्ये त्यांच्या वाचनातून आलेल्या पाश्चात्य पुराणकथा, पाश्चात्य साहित्यकलाकृतींमधील व्यक्तिरेखा इत्यादींचे निर्देश मोठ्या प्रमाणावर आहेत. पण त्यांचे ते संदर्भाविश्व सर्वसामान्य मराठी वाचकाला परकेच राहते.) 'श्रुतयोजन' या संज्ञेची 'मराठी वाङ्मय कोशा'तील व्याख्या अशी आहे : ''लोकविश्रुत साहित्यातील कथा, व्यक्तिविशेष, किंवा कविता यांची सूचक/अप्रत्यक्ष आठवण करून देणारे शब्द लेखनात योजणे.'' (खंड ४, पृ. ३६०) येथील 'लोकविश्रुत' हा शब्द महत्त्वाचा आहे.

श्रुतयोजनांमध्ये कोणकोणत्या गोष्टी समाविष्ट होतात, हे जाणून घ्यायला हवे. समाजमनात घर करून राहिलेल्या कविता, गाणी यांतील एखादा चरण (उदा० 'लहानपण देगा देवा', 'गंगायमुना डोळ्यांत उभ्या का ?') एखादा शब्दप्रयोग (उदा० वार्धक्याचा उल्लेख करताना 'कृतान्तकटकामलध्वजजरा' हा मोरोपंतांचा शब्द वापरणे) संस्कृत भाषेतील एखादे वचन/सुभाषित (उदा० जीवो जीवस्य जीवनम् !), लहानपणी ऐकलेल्या रामायण-महाभारत-पुराणांतील कथा, ऐतिहासिक कथा, लोककथा (उदा० कृष्णसुदामा भेट), थोर पुरुषांचा एखादा संदेश (उदा० 'स्वातंत्र्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे.') एखाद्या गाजलेल्या कलाकृतीचे शीर्षक (उदा० 'पण लक्षात कोण घेतो ?') अशा असंख्य गोष्टी श्रुतयोजनांमध्ये स्थान मिळवू शकतात.

श्रुतयोजन म्हणजे पांडित्यप्रदर्शन नव्हे. त्यात परंपरेत विरघळून गेलेल्या साहित्यकृतींतील संदर्भांचे स्मरण असते. जसे काव्याला वाहिलेल्या नियतकालिकाचे 'कवितारती' हे शीर्षक वाचताना कवी चंद्रशेखरांच्या त्याच शीर्षकाच्या कवितेची आठवण साहजिकच होते. मात्र केवळ स्मरणरंजन करणे, हा श्रुतयोजनाचा एकमेव हेतू नसतो. श्रुतयोजनातून वापरणाऱ्याच्या तल्लख स्मृतीचे दर्शन जसे घडते, तसेच

परंपरेतील संदर्भांना नवी झळाळी प्राप्त करून देण्याचे कामही साधले जाते. ही नवी झळाळी वेगवेगळ्या प्रकारे प्राप्त होत असते. त्यामागे कलात्मक आकाराचे नवनवे कल्पनाबंध असतात. याची काही उदाहरणे पाहू या.

'व्यक्ति आणि वल्ली'मध्ये चौकोनी कुटुंबातील मालतीबाईंचा हस्तलिखित कवितासंग्रह पाहताना त्यांच्या विणकामाचे कौतुक करून 'प्रसंगाचा कात्रज केला' असे पु.ल. देशपांडे लिहितात. येथे कात्रजच्या घाटात बैलांच्या शिंगांना पलिते बांधून शत्रूची दिशाभूल करणाऱ्या शिवाजीची गोष्ट आठवते. या गोष्टीच्या आठवणीतूनच 'कात्रज करणे' या शब्दप्रयोगाचा लक्षणेने कळणारा 'शत्रूची दिशाभूल करून स्वत:चा बचाव करणे' हा अर्थ उलगडतो. लेखकाचे मार्मिक स्मरण आणि त्यातून आलेले भाषिक कौशल्य येथे वाचकांची दाद मिळवून जातात. मात्र श्रुतयोजन हे भाषेचे निव्वळ एक लेणेही नव्हे. साहित्यसंस्कृतीचे परंपरागत सत्त्व आत्मसात करीत भाषा कशी संपन्न बनत जाते, याचे जिवंत उदाहरण म्हणून श्रुतयोजनाकडे पाहायला हवे.

साहित्याची परंपरागत चाकोरी नाकारणाऱ्या मंडळींनीही श्रुतयोजनाद्वारे आपले परंपरेशी असलेले जैविक नाते टिकवून धरलेले दिसते. याचे एक उदाहरण म्हणजे मर्ढेकर. मर्ढेकरांनी आपल्या काव्यात संस्कृत उपनिषदे, प्राचीन-अर्वाचीन मराठी काव्य यातील अनेक वचनांचा 'पाठभेद' करून वापर केला. बदललेल्या काळामुळे जगण्याची बदललेली लय सुचवण्यासाठी श्रुतयोजनांमध्ये हेतुपुरस्सर पाठभेद केले. उदा० 'घनश्यामसुंदरा श्रीधरा गिरिणोदय झाला' तसेच 'सर्वे जन्तु रुटिन:।' यातील मूळ भूपाळीतील व उपनिषदीय वचनांतील हे बदल यंत्रयुगीन, महायुद्धोत्तर जीवनक्रमाचा उपहास करणारे ठरतात. उपहासाप्रमाणेच उपरोधासाठीही त्यांनी श्रुतयोजनांचा कलात्मक वापर प्रभावीपणे केला. त्यांची 'देवाजीने करुणा केली' ही कविता येथे आठवते. मूळचे ते गीत पिके तयार झाल्यावर कापणीच्या वेळी म्हणायचे लोकगीत होते. त्यात परमेश्वरावरील निरतिशय श्रद्धाभाव होता. मर्ढेकर त्यातील सुरुवातीची ओळ तिरप्या ठशात लिहितात आणि पुढे देवाच्या अस्तित्वावरील भाबड्या श्रद्धेला हादरे देणाऱ्या उपरोधिक अशा ओळींमागून ओळी कवितेत येत राहतात ! मात्र मर्ढेकरांनाही कधीकधी श्रुतयोजन आहे त्या स्वरूपातही स्वीकारार्ह वाटते. उदा० 'द्रौपदीचे सत्त्व माझ्या लाभू दे भाषाशरीरा' हे त्यांचे मागणे महाभारतातील द्रौपदीच्या वस्त्रहरणाच्या गोष्टीचे स्मरण देते आणि स्वत:च्या भाषाशरीराला द्रौपदीचे सत्त्व लाभो अशी प्रार्थना करते. (मर्ढेकरांच्या काव्यातील श्रुतयोजन हा खरे तर एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.)

विंदा करंदीकर 'यंत्रावतार' या कवितेच्या शेवटी यजुर्वेदातील शांतिपाठाच्या चालीवर








'ॐ क्रांतिः क्रांतिः क्रांतिः' असा क्रांतिपाठ योजतात. येथे शांतीच्या विरोधी अशा क्रांतीचा उद्‌घोष करण्यामागे काळानुरूप बदललेल्या मूल्यांची प्रतिष्ठापना करण्याची कवीची भूमिका आहे. मात्र त्यातील विरोध अधोरेखित करण्यासाठी कवीला शांतिपाठाचा साचा वापरावासा वाटतो ! 'परंपरा आणि नवता' यांचे जैविक नातेही यातून एकप्रकारे लक्षात येते.

साहित्यिकांना श्रुतयोजनाकडे वळावेसे वाटते, कारण लोकमानसाला मोठ्या प्रमाणावर साद घालण्याची आवाहकता श्रुतयोजनांमध्ये असते. 'चांदोबा चांदोबा भागलास का ?' हे मराठीपणाचे व्यवच्छेदक लक्षण असणारे बालगीत आहे. (त्या गीताचे कविनाम विस्मरणात जमा होणे, हेही अशा वेळी साहजिकच ठरते !) लहानपणी ऐकलेले हे गीत पुढे मनात - नेणिवेत - पार विरघळून जाते. गंगाधर गाडगीळ जेव्हा 'भागलेला चांदोबा' हे शीर्षक आपल्या नवकथेला देतात, तेव्हा त्यात या बालगीताची छाया जाणवून अनेकांच्या मनातील स्मृतींची तार छेडली जाते. श्रुतयोजनांमध्ये कवितेतील अवतरणांना मोठ्या प्रमाणावर स्थान मिळालेले दिसते. विशेष म्हणजे काव्य, नाटके, कथा-कादंबऱ्याच नव्हे, तर समीक्षाग्रंथांच्या शीर्षकस्थानीही कवितेतील अवतरणांना स्थान मिळालेले आहे ! ('कवितेचा कुंकुमतिलक' - डॉ. नीलिमा गुंडी, 'महाराष्ट्र टाइम्स' २३-९-१९९८ पृ. ५ व ७)

श्रुतयोजनांना प्रतीक - प्रतिमारूप देणारी सर्जनशील प्रतिभा साहित्यक्षेत्रात अनेकदा पाहायला मिळते. विजय तेंडुलकरांच्या 'शांतता, कोर्ट चालू आहे' या नाटकात बेणारेबाईंची व्यथा प्रगट करण्यासाठी घरटे चोरले गेलेल्या चिमणीचे गाणे योजले आहे. 'माझा घरटा कोणी नेला ?' या श्रुतयोजनाला तेथे भावगर्भ प्रतिमेचे स्थान मिळाले आहे. (बालकवी यांनी इंग्रजीतून अनुवादित केलेले हे बालगीत पूर्वी अभ्यासक्रमात समाविष्ट असल्यामुळे अनेकांना माहीत असे.) सतीश आळेकर यांनी 'बेगम बर्वे' या नाटकात 'मूर्तिमंत भीती उभी' या ('शारदा' नाटकातील) गाण्याचा केलेला वापरही कलात्मकदृष्ट्या अर्थपूर्ण आहे. पूर्वी शालेय पाठ्यपुस्तकात भेटणारा सोने लुटून आणणारा 'मोरू' जेव्हा पाडगावकरांच्या कवितेचा विषय बनतो, तेव्हा तो मध्यमवर्गीय प्रवृत्तींचे प्रतीक बनतो. श्रुतयोजनाला 'प्रतीक'रूप कसे मिळते, हे येथे लक्षात येते. द.भा. धामणस्करांची 'हस्तांतर' ही कविता वाचताना श्रुतयोजनाला मिळालेले प्रतिमारूप पाहायला मिळते. मुलाचे तारुण्य स्वत:कडे घेणाऱ्या भोगप्रवण ययातीची महाभारतातील कथा यात आठवते. गणपतीची मूर्ती मुलाकडे सोपवणारा यातील पिता 'ययातीसारखा' असतो आणि मुलगा परंपरेच्या ओझ्याने वाकलेला असतो ! येथे ययातीची चिरपरिचित कथा काही बाबतीत कात टाकून समोर येते.

परंपरेचा वारसा जपताना तरुण पिढीवर येणारे सांस्कृतिक दडपण येथे सुचवले जाते. श्रुतयोजनातून घडणारे हे अर्थांतरण वाचकांना अनपेक्षित आशय व्यक्त करून धक्का देते. साहित्यात अशी नव्या अर्थाने रुजणारी श्रुतयोजने म्हणजे साहित्याच्या पारंब्याच ठरतात. श्रुतयोजनाचा वापर कधीकधी पांडित्य-प्रदर्शनाच्या हौसेपोटीही केला गेला आहे. काहींनी कलाकृतींशी पूर्णपणे एकजीव न झालेल्या श्रुतयोजनांचा वापर केला, हेही खरे ! पण त्यामुळे श्रुतयोजनाचे मूळचे महत्त्व कमी होत नाही. किंबहुना श्रुतयोजन आणि त्यातून आलेली संदर्भसंपन्नता यांमुळे जी अर्थवलये निर्माण होतात, त्यांमुळे कलाकृतीला अर्थघनता येत असते, हे विसरून चालणार नाही.

समाजाची भाषिक - सांस्कृतिक नाळ ज्या संचिताशी जोडलेली आहे, त्यापासून आजची पिढी अनेक कारणांमुळे लांब जात चालली आहे. अशावेळी या संचिताचा कोशरूपाने संग्रह करण्याची गरज आहे. मराठी मनाच्या भावजीवनात घर करून राहिलेल्या वचनांमध्ये मराठी, संस्कृत, याबरोबर हिंदी-इंग्रजी भाषांमधील काही वचनेही असणार. उदा० 'चले जाव' हा भारतीय स्वातंत्र्य-चळवळीचा बीजमंत्र त्यात असणार नि 'टु बी ऑर नॉट टु बी' हा हॅम्लेटचा जीवघेणा पेचही असणार ! या श्रुतयोजनांचा संदर्भासह कोश केला तर तो बृहद्प्रकल्प ठरेल ! व्यासंगी मंडळींनी हा प्रकल्प हाती घ्यायला हवा. अन्यथा हा भाषिक वारसा योग्य प्रतिसाद न मिळाल्यामुळे हळूहळू विस्मरणात जमा होईल.

अशा अवतरण - कोशनिर्मितीचे काही प्रयत्न झालेले आहेत, हे येथे नमूद करायला हवे. डॉ. शशिकला गोरे यांनी 'काव्य अवतरण कोश' (१९९३) तयार केला असून त्यात एक सहस्र मराठी काव्य-अवतरणे समाविष्ट आहेत. तसेच अमरेंद्र गाडगीळ यांनी १९७६मध्ये संपादित केलेल्या 'उक्तिविशेष' या संस्कृतवचन-कोशाची परिवर्धित आवृत्तीही नुकतीच प्रकाशित झाली आहे.

आधुनिक तंत्रज्ञानाची मदत घेऊन मौखिक परंपरा जपण्याचे प्रयत्नही होऊ लागले आहेत. पारंपरिक वृत्त-छंदांच्या चाली देऊन 'आठवणीतील कविता' ध्वनिफितींच्या रूपाने आणण्याचे काम वीरेंद्र गोपुजकर करीत आहेत. भाषेची सय आणि लय मनात रेंगाळत राहण्यासाठी अशा अनेकविध प्रयत्नांची कास धरायला हवी. 'हिचे पुत्र आम्ही, हिचे पांग फेडू' हे कविवर्य माधव जूलियनांनी समस्त मराठी भाषकांच्या वतीने मायबोली मराठीला दिलेले जे आश्वासन आहे, ते अजूनही पूर्ण व्हायचे आहे. शेवटी 'केल्याने होत आहे रे', हेच खरे !

■

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे ४११ ००२








अनुक्रमणिका

# मराठी माध्यमाच्या शाळांची घटती संख्या !

मराठी मातृभाषा असलेल्या महाराष्ट्रात मराठी शाळांची टक्केवारी घसरत आहे. राज्यात गेल्या दहा वर्षांत इंग्रजी माध्यमाच्या शाळांत सुमारे एक टक्क्याने, तर विद्यार्थ्यांत पावणेतीन टक्क्यांनी वाढ झाली आहे. याउलट मराठी शाळांचे प्रमाण पाऊण टक्क्याने कमी झाले आहे, तर विद्यार्थ्यांची संख्या सव्वादोन टक्क्यांनी घसरली आहे.

मराठी माध्यमाच्या शाळा कमी होत आहेत आणि अनेक शाळांतील मराठी माध्यम बंद पडत आहे, या तक्रारीबाबतचे नेमके चित्र काय आहे, हे जाणून घेण्याचा प्रयत्न पुण्याच्या दै.'सकाळ'ने केला. त्यासाठी १९९३-९४ आणि २००२-२००३ या दोन शैक्षणिक वर्षांतील राज्यातील प्राथमिक शाळा आणि त्यांमधील विद्यार्थ्यांची संख्या यांची आकडेवारी शिक्षण विभागातून मिळविली. या दोन शैक्षणिक वर्षांत नऊ वर्षांचे अंतर आहे. या कालावधीला जागतिकीकरण, खासगीकरण, माहिती तंत्रज्ञान क्रांती, सेवा उद्योगांची वाढती व्याप्ती, बीपीओ आदींचे संदर्भ आहेत. आधुनिक तंत्रज्ञान आणि जागतिकीकरणाने इंग्रजीचे महत्त्व अधोरेखित झाले आणि त्यामुळेच इंग्रजी माध्यमाच्या शाळा वाढू लागल्या, असा निष्कर्षही काढता येऊ शकतो.

१९९३-९४ या वर्षात महाराष्ट्रात एकूण ६०,२४९ प्राथमिक शाळा होत्या. त्यापैकी ९१.२१ टक्के म्हणजे ५४,९५३ शाळा मराठी माध्यमाच्या होत्या. विद्यार्थ्यांची एकूण संख्या १,१०,६५,११९ होती. त्यापैकी ८३.८९ टक्के (९२,८२,१६४) विद्यार्थी मराठी शाळांत होते. इंग्रजी माध्यमाच्या शाळांचे प्रमाण केवळ २.१६ टक्के (१३०१ शाळा) होते आणि तेथील विद्यार्थ्यांची संख्या ४.६४ टक्के (५,१३,९६३) होती.

नऊ वर्षानंतर म्हणजे २००२-०४मध्ये इंग्रजी शाळा जवळजवळ दुपटीने (२०६७ शाळा) वाढल्या आणि विद्यार्थीसंख्याही (८,४५,४६७) त्याच प्रमाणात वाढली. शाळांमध्ये ०.९१ टक्क्याने तर विद्यार्थीसंख्येत २.६३ टक्क्याने वाढ झाली. या काळात मराठी शाळाही वाढल्या; पण त्यांचा वेग इंग्रजीच्या तुलनेत कमी होता. शिवाय एकूण शाळा आणि विद्यार्थीसंख्येशी तुलना करता ही वाढ नकारात्मक (म्हणजे घटच !) आहे. २००२-०३मध्ये शाळांची संख्या ६६,६२५ वर गेली आणि विद्यार्थीसंख्या १,१६,३०,५७५ वर गेली. मराठी शाळा ५३७१ ने आणि विद्यार्थीसंख्या

२,१५,०८७ ने वाढली;. पण एकूण शाळांच्या आणि विद्यार्थ्यांच्या वाढीच्या तुलनेत त्यामध्ये ०.६७ टक्क्याने घट झाली. म्हणजे १९९३-९४ या काळात मराठी शाळांचे प्रमाण ९१.२१ टक्के होते. ते आता ९०.५४ टक्क्यांपर्यंत खाली गेले. विद्यार्थीसंख्येतील घट याहून अधिक आहे. १९९३-९४मध्ये विद्यार्थ्यांचे प्रमाण ८३.८९ टक्के होते, ते ८१.८६ टक्क्यांपर्यंत (संख्या ९४,९७,२५१) म्हणजे २.२३ टक्क्यांनी खाली आले.

थोडक्यात, मराठी शाळांमधील विद्यार्थीसंख्या ज्या प्रमाणात कमी झाली, त्याच प्रमाणात इंग्रजी शाळांतील विद्यार्थीसंख्या वाढली आहे.

■

**'दै. सकाळ'**, १८-०५-०५

## माझे भाषाशुद्धीचे प्रयोग

कार्यालयात नेहमीप्रमाणे कामकाज सुरू झाले. पहिल्याच केसमधला साक्षीदार अपघाताच्या प्रकरणातला. प्रश्न विचारायला सुरवात केली.

''अपघात कुठे झाला ?''

''रोडवर, नगर-बीड रोडवर !''

''म्हणजे सडकेवर''

''नाही रोडवर''

त्याची भाषा शुद्ध करण्याचा प्रयत्न फसल्याने मी निमूटपणे साक्ष नोंदण्यास सुरुवात केली. पण माझ्या मराठी शुद्धतेच्या आग्रहाचे निमंत्रण स्वीकारून साक्षीदाराने माझ्या मराठी भाषेची कसोटी पहाण्याचे ठरविले.

''गाडी कोणत्या दिशेने आली ?''

''राखीस मुखाकडून''

''आँ ?'' मी.

''अवो, गाडी राखीस मुखाकडून गंगाकडे चालली होती'' साक्षीदार.

माझे मराठीचे ज्ञान तोकडे पडले. मी मदतीसाठी वकिलाकडे पाहिले.

''राखीस मुख म्हणजे दक्षिण, गंगाकडे म्हणजे उत्तर दिशा'' वकिलाने खुलासा केला.

**उदय शुक्ल,** दै. गावकरी, ५-१०-०३








अनुक्रमणिका

# शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय

**वा. भा. जोशी**

मार्च २००४ च्या शालान्त परीक्षेस सुमारे १४ लाख विद्यार्थी बसले होते. सुमारे सात लाख पास झाले. त्यातही २ लाख १५ हजार विद्यार्थी मराठी विषयात अनुत्तीर्ण झाले. तशी ती बातमी जाड मथळ्यात प्रसिद्धही झाली. इंग्लिश, गणित, सामाजिक शास्त्रे हे नापासाचे प्रमाण जास्त असणारे तसे घाऊक विषय. त्यात मराठी या विषयाची भर पडावी या दु:खास खरे तर पारावार नाही.

एकाच्या ठिकाणी आठ एसेस्सी बोर्डे, आकडेमोडीस संगणकांचे ताफे, तथाकथित शिक्षणतज्ज्ञांची मार्गदर्शक मंडळे अशी परीक्षा - मंडळाची आघाडी असताना परीक्षेचा निकाल असा कसा ? यावर 'तुमची शिक्षक मंडळीच प्रश्नपत्रिका काढतात व तपासतात' असे उत्तर बोर्डाचे अधिकारी म्हणे ऐकवितात. यात थोडे तथ्य असणारच. पण आपली जबाबदारी झटकण्याची बोर्डाची चलाखीच इथे दिसून यावी.

**सदोष प्रश्नपत्रिका**

बोर्डाने ठरवून दिलेल्या ढाच्याप्रमाणे प्रश्नपत्रिका तयार करणे अपेक्षित आहे. पण मागील वर्षीची प्रश्नपत्रिका पुढ्यात ठेवून नवी प्रश्नपत्रिका तयार करण्याची खोड दिसून येते. दीर्घोत्तरी ('क्रिटिकल') व लघूत्तरी ('कन्टेट') प्रश्नांचे स्वरूप काटेकोरच हवे. पण त्यात थोडी बेफिकिरी दिसते. २००४ च्या मराठी प्रथम भाषा प्रश्नपत्रिकेत एकाच गद्य-पद्य पाठावर दोन किंवा तीन प्रश्न विचारले आहेत. 'कलावंताच्या प्रतिभा सामर्थ्याचे वर्णन कवी कसे करतो ?' ह्या दीर्घोत्तरी प्रश्नानंतर त्याच कवितेतील 'आम्हाला वगळा विकेल कवडी-मोलावरी हे जिणे' हे अवतरण संदर्भस्पष्टीकरणासाठी दिले आहे. व्याकरणात त्याच कवितेच्या शार्दूलविक्रीडित वृत्ताचे लक्षण व उदाहरण लिहा, असा प्रश्न आहे. म्हणजे 'आम्ही कोण ?' या एकाच कवितेवर ३+३+२ असे आठ गुणांचे प्रश्न आहेत. अशी 'गंमत' सबंध पुस्तक अभ्यासणाऱ्यांस वैताग आणते. प्रश्नपत्रिकेस सबंध पाठ्यपुस्तकाचा स्पर्श होणे अपेक्षित असताना असे घडते, यास काय बरे म्हणावे ?

मराठी (द्वितीय भाषा) प्रश्नपत्रिकेत निबंधाचे मुद्दे देण्यातही ढिसाळपणा दिसतो. 'फाटक्या पुस्तकाचे आत्मवृत्त' निबंधासाठी 'ग्रंथ हेच गुरू होत याचा प्रत्यय कसा







आला ?' हे वाक्य मुद्दा म्हणून दिले आहे, ही त्याची बारीकशी वानगी.

मराठी प्रथम भाषा प्रश्नपत्रिकेत व्याकरणासाठी पंधरा गुण असतात. त्यात व्याकरण चालविण्यासाठी तीन गुण दोन शब्दांसाठी असतात. वाक्यातील अधोरेखित एका शब्दास दीड गुण, हा तद्दन विचित्रपणा आहे. गेल्या वर्षी अधोरेखित शब्दांचे व्याकरण चालवा अशी सूचना होती; पण एकाही शब्दाखाली रेष नव्हती. तेव्हा विद्यार्थ्यांनी काय केले असेल ते देव जाणे ! वृत्ताच्या लक्षणास एक गुण व उदाहरणास एक गुण असतो. पण बारावीच्या प्रश्नपत्रिकेत ह्याच प्रश्नास चार गुण असतात. मग दहावीसाठी कंजुषी का ?

उतारा-आकलनाचा एक प्रश्न असतो. त्यात गद्य उताऱ्यासाठी पद्य उताऱ्याचा पर्यात दिलेला असतो. पद्य उताऱ्याचा पर्याय कशासाठी ? जणू पर्याय न देणे म्हणजे शैक्षणिक गुन्हाच हे धोरण योग्य नव्हे.

मराठीची प्रश्नपत्रिका तब्बल आठ ते दहा पानी असते. भरपूर सुटी जागा आणि मोठ्ठे अक्षर ही उधळपट्टी टाळली तर तीच प्रश्नपत्रिका चार पानात बसू शकते. गाईडवाले फक्त दोन पानांत ती सुंदर छापतात. उत्तरपत्रिकाही सोळा पानी एकच दिली तर पुरवण्या जोडण्याचे सव्यापसव्य वाचेल. दोनशे वीस ते अडीचशे ओळीत लिखाण अपेक्षित असल्याने सोळा पाने अगदी पुरेशी आहेत. पुरवणी जोडणे टळले तर परीक्षक-निरीक्षकांचेही काम वाचेल. (त्यासाठी बोर्डास विद्यार्थ्यांपेक्षा कंत्राटदारांची काळजी घेण्याचे धोरण सोडावे लागेल !)

**मार्गदर्शनाचा पाऊस (वेळी - अवेळी)**

१९७५ पासून बहुतेक सर्व वृत्तपत्रे दहावी अभ्यासाचा रतीब घालतात. वृत्तपत्राचा खप कायम राखणे किंवा वाढविणे हा त्यांचा प्रधान हेतू असतो. दहावी अभ्यासाची सदरे लिहिणारे तज्ज्ञ शिक्षक अक्षरशः भरमसाट लेखन करतात. दहा ओळींचे अपेक्षित उत्तर तीस ओळींत आणि दोनशे पन्नास शब्दांचा निबंध पाचशे शब्दांत लिहिलेला पाहून वाचक-विद्यार्थ्यास काय वाटत असेल ? प्रत्येक प्रश्नाचे उत्तर लिहिताना 'हा प्रश्न अमुक धड्यातील आहे. तो धडा अमक्या पुस्तकातून घेतला आहे. त्याचा लेखक अमुक आहे', हा ह्या तज्ज्ञांचा आग्रह कशासाठी ? व्याकरण चालविताना जे अपेक्षित अचूक उत्तर दीड-दोन ओळीत लिहिता येते, त्यासाठी मूळ शब्द, लिंग, वचन, विभक्ती, कारकार्थ वगैरेचा रकाना आखून उत्तरे लिहिण्याचा 'आदर्श' केवळ टाइमपास ठरतो. पण गाइडवाले आपलीही 'शायनिंग' विद्यार्थ्यांवर लादतात. अलंकाराचे लक्षण व उदाहरण अपेक्षित असताना पुन्हा त्या उदाहरणाचे स्पष्टीकरण लिहून दाखवितात. अपेक्षित ओळींच्या उत्तरापेक्षा पानभर लेखन करा, हे ठसविण्याची खोड अजूनही





अनुक्रमणिका

कमी झालेली दिसत नाही. मातृभाषेतील अचूक उत्तरास पैकीच्या पैकी गुण देणे हे पापच आहे, हाही समज अजून जिवंत दिसतो. (मुले मराठी सोडून दुसरी भाषा का निवडतात, ते इथे समजून यावे.)

**मराठी कच्चे का ?**

विना अनुदान पद्धतीने शाळा खोलण्याचे धोरण अधिक राजकारण यामुळे शाळा मोठ्या संख्येने निघाल्या आहेत. शाळेतील विद्यार्थ्यांची मोठी संख्या टिकवून धरणे मग क्रमप्राप्त ठरते. मग वर्ग टिकावेत, शिक्षक टिकावेत म्हणून 'ढकलगाडी' सुरू होते. पाचवीपासून दहावीपर्यंत अशी ढकलगाडी चालू राहाते. दहावीपर्यंत मुले व शिक्षक बिनधास्त असतात. बोर्डाच्या परीक्षेत मग हे बिंग फुटते. '३० शाळांचे निकाल शून्य टक्के' अशा बातम्या वाचण्याची आपणांवर पाळी येते ती म्हणूनच.

मराठी पाठ्यपुस्तक तयार करताना लोकशाहीच्या विकृत समजामुळे लेखकाची जात, प्रादेशिकता असल्या अशैक्षणिक गोष्टी विचारात जास्त घेतल्या जातात. त्यामुळे रुक्ष वेचे अभ्यासणे भाग पडते. जुन्या पिढीतील विचारवंतांचे विचार संकलित, संपादित करून देणे आवश्यक आहे. पण तसे कष्ट घेण्याचे बोर्डाचे धोरण दिसत नाही. पांढरा शुभ्र कागद, सुंदर छपाई गाइडवाल्यांना परवडते, पण बोर्डाला मात्र नाही. हे संतापजनक आहे. गेली दहा वर्षे साचत आलेल्या अशा अपप्रवृत्तींमुळेच मराठीचा निकाल ढेपाळत चालला आहे. शिक्षकांसाठीच्या हस्तपुस्तिकांची गणना विनोदी वाङ्मयात करावी लागेल. 'सर्व शिक्षण मोहीम प्रशिक्षण' पुस्तिकेच्या प्रस्तावनेत मातृभाषेचे ऋण फेडण्याची तळमळ दाखविली आहे. पण श्रेयनामावलीत ३१ तज्ज्ञांपैकी तेरा व्यक्तींची नावे इंग्लिश आद्याक्षरी छापली आहेत. जसे - एस.आर. जगदाळे, एम.जी. मराठे (हे संचालकच आहेत !).

'पॅटर्न' पद्धतीच्या फॅडमुळे का कुणास ठाऊक पण डिसेंबरपर्यंत दहावीचा अभ्यासक्रम पूर्ण करून मोकळे होण्याची प्रथा रूढावत चालली आहे. याचाच दुसरा अर्थ अभ्यासक्रमाचा फेरविचार करणे गरजेचे आहे. दहावीतील पाल्याने इ. १ ली पासून खूप परीक्षा दिलेल्या असतात. तशीच दहावीची परीक्षा. पण ती शालान्त आहे, म्हणून जास्तीत जास्त गुण मिळविण्यासाठी झटणे, इतपत अपेक्षा ठीक. तिचा नसता बाऊ नको. अभ्यासाच्या मार्गदर्शनाच्या बहाण्यातून विद्यार्थ्यांवर आहारा-विहाराच्या फालतू सूचनांचा मारा करणे स्वयंघोषित शिक्षणतज्ज्ञांनी टाळले पाहिजे. किंवा अशा उपदेशाकडे विद्यार्थ्यांनी दुर्लक्ष केले पाहिजे.

दहावीला दोन लाख मुले मराठीत नापास झाली, त्याबद्दल महाराष्ट्राच्या विधिमंडळात कोणीही आवाज उठवल्याचे वाचले नाही. 'कमर्शियल मार्केटिंग'मध्ये

दहावीची परीक्षा सापडली हे सुचिन्ह नक्कीच नव्हे.

अतिपरिचयामुळे मातृभाषा मराठीची हेळसांड होता कामा नये. तसेच अन्य विषयांच्या संकल्पना मराठीतून अधिक चांगल्या रुजू शकतात हे जाणून अन्य विषयांच्या शिक्षकांनीही आपले अध्यापन, कथन प्रभावी मराठीत केले पाहिजे. विविध प्रसार माध्यमांनी 'दहावी' हाताळली तरी वर्गातील शिक्षकांच्या अध्यापनाची गोडी अधिक हे विद्यार्थ्यांना जाणवले पाहिजे. ह्याची जबाबदारी अर्थातच शिक्षकांची आणि त्यांची नियुक्ती करणाऱ्या जाणत्या शासनाची आहे.

■

स्नेहव्हिला, ९०५, डे.जि., पुणे ४११००४.

(१९ डिसेंबर २००४ रोजी झालेल्या चर्चासत्रात हा निबंध वाचण्यात आला. चर्चासत्राचा वृत्तान्त याच अंकातील 'परिषद-वार्ता'मध्ये पाहावा.)

**निवेदन**

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक : २००५

मराठी अभ्यास परिषद महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने १९८३ पासून महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक देत असते.

पारितोषिकाची रक्कम रु. ५०००/- आहे. २००५ च्या पारितोषिकासाठी १ जानेवारी २००३ ते ३१ डिसेंबर २००४ या दोन वर्षांतील भाषाविषयक लेखन विचारात घेतले जाणार आहे.

लेखक/प्रकाशकांनी या काळातील प्रकाशित/अप्रकाशित लेखन पारितोषिक निवड समितीच्या विचारार्थ ३१ ऑगस्टपर्यंत पाठवावे. अशी विनंती आहे.

(कृपया कथा, कविता, कादंबरी, नाटक इ० प्रकारचे ललित लेखन पाठवू नये.)

नीलिमा गुंडी,
कार्यवाह मराठी अभ्यास परिषद, ३, 'अन्नपूर्णा,' १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५, वाडिया रुग्णालयासमोर, पुणे ४११००२.

सूचना-फलक : ( मागील अंकात पृ. ५ वर आहे )








# शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय

**स्वामिनी रुद्रभटे**

शालान्त परीक्षेचा निकाल जाहीर झाला. मातृभाषा असणाऱ्या मराठीमध्ये अनेक विद्यार्थी नापास झाले होते. इतर सर्व विषयात उत्तमरीत्या पास असणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठीने दगा दिला होता.

इतकं का मराठी अवघड असतं ? अगदी इंग्रजीपेक्षा ?... गणितापेक्षा ?... असे अनेक प्रश्न उठू लागले. अचानक उठलेल्या वावटळीने मराठी अध्यापक वर्ग जागा झाला. मराठीच्या अध्यापनाचं मूल्यमापन सुरू झालं. शाळा-शाळांमधून आकडे मांडले जाऊ लागले... तज्ज्ञांच्या बैठका झाल्या आणि मराठी अभ्यास परिषदेनेही याची दखल घेतली. चुकलो कुठे ?... चुकतंय कुठे ? यावर चर्चासत्रे आयोजित होऊ लागली.

मला मनोमन आश्चर्य वाटू लागले. माझ्या शाळेतील एकही विद्यार्थी नापास झाला नव्हता. मराठीत ७५% व त्यापेक्षा जास्त गुण मिळवणारे विद्यार्थी माझ्या शाळेत आहेत. यावर्षी सर्वात अधिक म्हणजे ८२% गुण मराठीत मिळवणारी मुलगी होती. आतापर्यंतच्या शाळेच्या निकालाच्या इतिहासात मराठीत ८९% पर्यंत गुण मिळवण्यात आम्ही यश संपादन केले आहे. आत्तापर्यंतच्या शाळेच्या १००% निकालात मराठीने कोठे बाधा आणली नाही हे मी अभिमानाने सांगू शकते यालाही अनेक कारणे आहेत.

मूल शाळेत जाऊ लागतं आणि आपल्या शिक्षणपद्धतीतील अनेक दोषांसह ते शिकू लागतं. पहिली-दुसरी-तिसरी-चौथी पर्यंत मराठी, गणित, इतिहास इत्यादीसारख्या विषयांचं ओझं पेलत असतानाच विषय वाढू लागतात. पाचवीत राष्ट्रभाषा म्हणून हिंदी, अंकगणिताच्या जोडीला बीजगणित, भूमिती येते. जागतिक भाषा म्हणून इंग्रजीही शिरावर आरूढ होऊन बसते.

या साऱ्या विषयांच्या गाठोड्यासह मूल दहावीच्या उंबरठ्यावर येऊन पोहोचतं आणि इथंच त्याला पहिली ठेच लागते. शाळेतल्या शाळेत तपासले जाणारे पेपर, नाव वाचल्यावर शिक्षकाच्या डोळ्यासमोर येणारं त्याचं व्यक्तिमत्त्व, पाचवीपासून दहावीपर्यंतची त्याची वाटचाल पेपर उघडताच डोळ्यासमोरून सरकन चलचित्रपटासारखी जाते. शिक्षकाचे पेपरबद्दलचे एकंदरीत मत पेपर तपासण्यापूर्वीच








ठरत जाते. हा मुलगा ५५ ते ६० चा आहे. हा ७० ते ८० चा, अगदीच दंगेखोर, अनियमित मुलगा ३५चा ठरत जातो. त्याच्या आत सहसा कोणी येत नाही. अशा तऱ्हेने शिक्षकांच्या डोक्यात फिट्ट बसणारे आकडे घेऊन मुले ९वीपर्यंत आलेली असतात. इथे आल्यावर मात्र बाहेरच्या जगात शाळेचे नाव अबाधित राहण्यासाठी चाळणी लावली जाते. काही मुले चाळणीतच (९वीतच) बैठक मारून बसतात. नववीच्या चाळणीतून सुटलेले विद्यार्थी दहावीच्या दारात अस्वस्थपणे उभे राहतात.

मुलाचे दहावीच्या वर्गात पदार्पण होते ते १ एप्रिलपासूनच ! १ एप्रिलपासून दहावीची जवळ जवळ नियमित शाळा सुरू होते. मे महिन्यात सुट्टी दिली जाते. त्या वेळी शाळेबाहेरील क्लासेस सुरू होतात. डॉक्टरी पेशात जसे विशेषज्ञ असतात तसे इथेही फिजिक्स, केमिस्ट्री, बायॉलॉजी, इ.चे विशेषज्ञ असतात. गणित/इंग्रजीचे विशेषज्ञ तर गल्लीबोळातल्या डॉक्टरांप्रमाणे भरमसाट आढळतात. उत्तम विशेषज्ञ आपल्याला मिळावेत म्हणून मुले ज्ञानाच्या शोधात चारी दिशांना धाव घेतात.

एक क्लास सुटला की दुसरा क्लास गाठण्यासाठी भरधाव वेगाने सायकलींवरून जाणारी मुले-मुली रस्त्याने जाताना दिसू लागतात. डॉक्टर नि पॅथॉलॉजिस्ट जसे एकमेकांशी समन्वय साधून असतात तसे इथेही दोन क्लास शिक्षक, क्लासच्या वेळेत १० मिनिटांचे अंतर ठेवून एकमेकांशी समन्वय साधतात.

एरवी कित्येकदा जड पावली, उदासीनतेने शाळेत येणारी मुले क्लासला मात्र पायाला यंत्रयान बसविल्याप्रमाणे जातात. का ? तर कोणाला डॉक्टर व्हायचे असते, कोणाला इंजिनियर, कोणाला पायलट तर कोणाला मरीन इंजिनियर ! यापैकी कोणत्याही क्षेत्रात मराठीची गरज भासत नाही किंबहुना मुलांना या धावपळीत मराठीचे भानही राहात नाही.

जून उजाडतो आणि शाळा सुरू होतात. एप्रिलमध्ये शाळेत झालेले धडे, मे महिन्यातले क्लासमधले अध्ययन आणि जूनमध्ये वर्गात चालू असणारे अध्यापन यांची सांगड घालता घालता विद्यार्थ्यांच्या नाकीनाऊ येतात. कित्येकांना आपल्याला काहीच समजत नाही असं वाटायला लागतं. अशा प्रकारे मुलांमध्ये न्यूनगंड निर्माण होत जातो.

ज्यांनी क्लास लावलाच नाही अशी मुले बहुधा खेड्यातून येणारी असतात. अशा मुलांमध्ये अकारण अस्वस्थता वाढलेली दिसते. अगदी 'क्लासवीना क्या जीना' अशी त्यांची अवस्था होते.

शाळा, क्लास आणि स्वयंअध्ययन यांच्या वेळा कशा सांभाळायच्या याबाबत मुलांची तारेवरची कसरत सुरू होते. क्लासमध्ये शिकलेले पाठ पुन्हा शाळेत शिकण्यात

स्वारस्य राहात नाही. नकळत मनोमन तुलना सुरू होते. मग वर्गातले तास बुडविण्याचे प्रकार सुरू होतात. त्याचा फटका इतर विषयांनाही बसतो. त्यातून अगदी मराठीचीही सुटका होत नाही.

या सर्वांचे परिणाम सहामाही परीक्षेत दिसतात. चित्त भानावर येते. काळ मागे लागतो नि अभ्यासक्रम पळवायला सुरुवात होते. एका पाठोपाठ एक वेगाने घास खाल्ल्यावर जसा ठसका लागतो त्याप्रमाणे पाठोपाठ होणाऱ्या गद्य-पद्य पाठांच्या अध्यापनाने मुले दबली जातात, काही मुले उद्रेकही करतात.

मुलांची मानसिकता बदलते. शारीरिक स्वास्थ्य बिघडते. जवळचे मार्ग शोधण्याला सुरुवात होते. मार्ग सापडतो तो अपेक्षितांचा ! सर्वांच्या अपेक्षा पुऱ्या करणारे अपेक्षित ! अपेक्षितातून अपेक्षित ते सारं मिळतं. आंधळ्याला काठी, बुडत्याला काडी, त्याप्रमाणे आळशाला अपेक्षिताचा आधार मिळतो. मग धडे शिकवून झाले रे झाले की अपेक्षिताधारे प्रश्नोत्तरे लिहून आणून आपल्या तत्परतेची पावती देणारे विद्यार्थी शिक्षकांनाही आवडू लागतात. कारण तज्ज्ञ अतिरथी-महारथींनी लिहिलेल्या अपेक्षितातील उत्तरांना शिक्षक बिचारे पामरपिसे... ते काय तपासणार ? घड्याळाच्या सेकंद काट्याच्या टिक टिक आवाजाच्या गतीने तेही टिक टिक खुणा करतात.

ग्रहण-क्षमतेच्या भिन्नतेमुळे काही मुले पुढे जातात तर काही मागे पडतात. विषय आवडीच्या भिन्नतेमुळे कोणी आवडीने तर कोणी जबरदस्तीने शिकत असतो. टक्केवारी वाढविण्यासाठी संस्कृत घेतले जाते तर मराठी सक्तीचे म्हणून अभ्यासले जाते. ८०% मुले मराठी सक्तीचे म्हणून अभ्यास करतात. १०% मुले गणित, विज्ञानाच्या गुणांना मराठीचे ग्रहण लागू नये म्हणून मराठीचा अभ्यास करतात. उरलेली १०% मुले मात्र मराठी आवडीने अभ्यासतात असे मला वाटते.

दहावी म्हणजे केवळ गणित, विज्ञान आणि इंग्रजी यांचाच अभ्यास ! बाकीचे विषय वाचून समजू शकतात. अशी अनेकांची समजूत. त्यामुळेही मराठीच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष होते.

मराठी शिकविणारे शिक्षक रुक्ष, रटाळपणे, पाल्हाळ लावून शिकविणारे असतील तरीही 'आधीच उल्हास त्यात फाल्गुन मास' या म्हणीनुसार मराठीची असलेली थोडीफार गोडीही लयाला जाते.

अध्यापनात मराठीची शब्दसंपत्ती डोळसपणे वापरली जात नाही. अकारण, न-साजेशी उदाहरणे देऊन शिक्षक मुलांच्या मनात गोंधळ निर्माण करतात.

बोलणे आणि लिहिणे यात तफावत पडते. प्रमाणभाषेची वानवा लिखाणात पावलोपावली आढळते याला कारण अनेक मुलांची वैयक्तिक पार्श्वभूमी भिन्न असते.

अनेक मुले आसपासच्या खेड्यांतून, वस्त्यांवरून तालुक्याकडे शाळेला येणारी असतात. त्यामुळे जो उत्तम बोलतो तो उत्तम लिहू शकेल याची ग्वाही नाही.

वाचून समजतं परंतु लिहिताना नेमकं काय लिहायचं ? समर्पक उदाहरणे नेमकी कुठे लिहायची ? वाक्यरचनांची मांडणी एखादी साखळी गुंफावी अशी कशी करायची? याचे तारतम्य मुलांना कळत नाही. यासाठी मार्गदर्शनाची गरज असते. स्वयंपाकाची पुस्तके वाचून, पदार्थ करणारी स्त्री, पुस्तकानुसार तंतोतंत घटक वापरते. अगदी पाव चमचा तिखट, अर्धा चमचा मसाला, चवीप्रमाणे मीठही तिला समजतं. तरीही पदार्थ तयार होत नाही. कारण 'गॅसला काडी लावा' हे पुस्तकात कुठे लिहिलेले नसते. त्यासाठी सामान्य ज्ञानाची गरज असते. तसे अध्ययनात सामान्य ज्ञान मुले वापरत नाहीत. पेपरमधूनही सामान्य ज्ञानाचा अभाव आढळतो. त्यामुळे लेखन बेचव, रसहीन होते.

मुलांचं सामान्य ज्ञान वाढवण्यासाठी अवांतर वाचनाची गरज असते. मुलांनी किमान रोजचे वर्तमानपत्र वाचले पाहिजे. ज्ञान अद्ययावत ठेवले पाहिजे. वर्तमानपत्रातून येणारे लेख, कविता, गोष्टी वाचून सामान्य ज्ञानात भर टाकली पाहिजे.

सुंदर अक्षर ही काही जन्मजात देणगी नव्हे ! त्यासाठीही प्रयासाची गरज असते. बोलताना सुंदर शब्द वापरणारा विद्यार्थी लिहिताना मात्र अक्षरांचे वळण विचित्र काढल्याने गुण गमावून बसतो.

सध्याच्या धकाधकीच्या जीवनात वास्तवात जगण्याची सवय झालेल्या मुलांमध्ये कल्पनाशक्तीचा अभाव आढळतो. निसर्ग त्यांच्यापुढे उभा असतो तो सिमेंटच्या जंगलांचा. नदी, डोंगर, हिरवळ त्यांना दिसते ती टीव्हीमध्ये. टीव्हीमधील नृत्यांच्या कवायती, अश्लील गाणी, मारामाऱ्या, खून, दरोडे या साऱ्या गोष्टी बधीर मनाने पाहणे या खेरीज त्यांच्यापुढे आदर्श नसतात. साहित्यिकांच्या मुलाखती, काव्यगायन, संत-चरित्रपर चित्रपट असे कार्यक्रम त्यांना मिळमिळीत वाटू लागतात. अशा प्रकारे स्वत:चे डोके बंद ठेवून कार्यक्रम पाहणारी मुले कल्पनाशक्ती गमावून बसतात.

नाही म्हणायला दुसरा प्रश्न डोक्याला फार तसदी देणारा नसतो. त्यात ६०% ते ७०% मुले १०पैकी १० गुण मिळवून जातात. उरलेल्या ३०% ते ४०% मुलांना पद्यपाठांच्या रिकाम्या जागा पूर्णपणे भरता येत नाहीत. जागा भरलीच असेल तर शब्द चुकीचा अथवा अशुद्ध लिहिला जातो. याचे कारण त्यांना कविता कळलेली नसते. कळत नाही म्हणून पाठ होत नाही. चाली लावलेल्या नसतात म्हणूनही पाठ होत नाहीत. शिवाय रिकाम्या जागा म्हणे शेवटच्या १० मिनिटात लिहायच्या असे ठरवूनच काही मुले पेपरला गेलेली असतात. परिणामी रिकाम्या जागा भरायच्या तशाच

राहून गेलेल्या असतात.

तिसऱ्या आणि चौथ्या प्रश्नात गद्य-पद्याचे दीर्घोत्तरी प्रश्न मुलांनी पाठच करून ठेवलेले असतात. प्रश्नपत्रिकांच्या आधारे अंदाज काढून देणारे शिक्षक आणि शिक्षकांची आज्ञा शिरसावंद्य मानून अपेक्षितांतून उत्तरे पाठ करून लिहिणारे विद्यार्थीच अधिक आढळतात. तपासनिसांनी डोळे झाकून अशा प्रश्नांना गुण देऊन आपली जबाबदारी पार पाडणे यापलीकडे मराठीचे मराठीपण असते याचा दोन्ही पक्षी विचार होत नाही.

यापेक्षा दीर्घोत्तरी प्रश्नातून अमुक मुद्दे यायला हवेत, असे सांगून त्या मुद्द्यांचा विस्तार स्वत:च्या भाषेत लिहायला सांगितला तर स्वत: तयार केलेले उत्तर मुलांच्या कायम स्मरणात राहील. अशाच प्रकारची लघूत्तरेही तयार करून घेणे शक्य आहे. असे केल्यास अपेक्षितांची काठी घेऊन मुलांना चाचपडावे लागणार नाही.

संदर्भाचा प्रश्न लिहिताना लेखक/कवी आठवत नसतात. मग ज्ञानदेवांच्या ओव्या एकनाथांच्या नावे तर तुकारामांचे अभंग ज्ञानदेवाच्या तोंडी आणि अगदीच नावे आठवली नाहीत तर संतांनी म्हटलेच आहे की, अशी सुरुवात करून स्वत:चे विचार संतांचे म्हणून खपवले जातात. संदर्भाचे वैशिष्ट्य लिहिताना बहुतांशी सर्वांना प्रश्न पडतो. मग 'लेखकाने अगदी समर्पक शब्दात उदाहरण दिले आहे.' 'लेखकाने अगदी मोजक्या शब्दात महान तत्त्व सांगितले आहे' अशी वैशिष्ट्ये ठोकून दिली जातात.

इथे आव्हान असते ते शिक्षकांना ! संदर्भ शिकविताना त्यांची वैशिष्ट्ये सांगून मोकळे न होता अनेक संदर्भ-वाक्यांचे विश्लेषण करण्याची गरज आहे. वैशिष्ट्य लिहित असताना संदर्भाचे वाक्य मनात घोळले पाहिजे. यातून लेखकाला नक्की काय सांगायचे आहे यावर अनेकांनी मते द्यायला हवीत; त्या सर्वांचा सुवर्णमध्य काढून मगच वैशिष्ट्य तयार व्हायला हवं. विद्यार्थ्यांना वैशिष्ट्य तयार करता आलं पाहिजे. केवळ अपेक्षितातील वैशिष्ट्य मुलांनी पाठ करू नये याकडे लक्ष द्यायला हवे.

व्याकरणाच्या सहाव्या प्रश्नात मुलांना वृत्त, अलंकार, वाक्यसंयोजन, व्याकरण चालविणे हे प्रकार समजले आहेत असे कधी जाणवतच नाही. व्याकरणाचा प्रश्न म्हणजे कवड्या-रेवड्यावारी गुण गोळा करणे. दोन गुणांच्या समासासाठी असंख्य सामासिक उदाहरणे पाहणं, तीन गुणांच्या व्याकरण चालवा प्रश्नासाठी विभक्ती, त्यांचे प्रत्यय, त्यांचे कारकार्थ, शब्दांच्या जाती, त्यांचे उपप्रकार, लिंग, वचन किती-किती पाहावं लागतं. वाक्य संयोजनाचेही तसंच. एवढा मोठा खटाटोप १-१ गुणासाठी कशाला ? म्हणून विद्यार्थी हा प्रश्न दुर्लक्षित करतात. किंवा ऐनवेळी परीक्षेत आसपास नजर फिरवून जमेल तेवढे लिहितात. अर्थातच असे विद्यार्थी १५ पैकी ३/४ गुण मिळवितात नि १०-१२ गुण गमावून बसतात. विरामचिन्हे आणि शुद्धलेखन यांचा



अनुक्रमणिका






अभ्यास...? छे ! या गोष्टी त्यांना हास्यास्पद वाटतात.

अशा प्रश्नांसाठी विद्यार्थ्यांना काही युक्त्या दिल्या तर ते त्यातून सहीसलामत सुटतील व 'थेंबा थेंबांनी तळं साठावं' त्याप्रमाणे १-१ गुणांनी १५ गुण मिळवून टाकतील. मी व्याकरण चालविण्यासाठी एक युक्ती मुलांना सांगून टाकली. दोन वाक्ये प्रश्नात दिलेली असतात. त्यात एखाद्या नामाखाली, एखाद्या सर्वनामाखाली एखाद्या विशेषणाखाली नि एखाद्या क्रियापदाखाली रेघ ओढलेली असतेच. पैकी नाम आणि सर्वनामाचे व्याकरण चालवणे सोपे जाते. हे व्याकरण चालवताना 'मुक्काम पोस्ट जावली विका.' हे वाक्य लक्षात ठेवावे. मुक्काम मधला 'मु' म्हणजे मूळ शब्द पोस्ट मधला 'पो' म्हणजे पोटप्रकार जावली मधला 'जा' म्हणजे जात, 'व' म्हणजे वचन, 'ली' म्हणजे लिंग, आणि विका मधले 'वि' म्हणजे विभक्ती व 'का' म्हणजे कारकार्थ. बस, एवढं मुलांनी लक्षात ठेवलं तर व्याकरण चालवायचे ३ गुण पदरात पडतात.

वृत्तांची उदाहरणे पाठ करण्यापेक्षा स्वत:चे एखादे उदाहरण तयार करून ठेवावे. जसे मालिनी वृत्तात 'ननमयय गणांनी मालिनी वृत्त होते' पेक्षा 'सतत करुनि अभ्यासास मी शीणले रे' हे उदाहरण स्वत:चे असल्याने लक्षात रहायला सोपे जाते. याची अक्षरे, गण, यति सारे सारे त्याप्रमाणेच असते.

पत्रलेखनाचे प्रकार हे विद्यार्थ्यांना एप्रिलातल्या जादा तासात नाहीतर जूनमध्ये दिले जातात. अधूनमधून 'पत्रांचा सराव करताय ना रे ?' असे काळजीयुक्त स्वर मुलांना ऐकवले जातात. त्याच त्या नेहमीच्या सवयीने मुले 'हो'... म्हणून दुर्लक्ष करतात नि मग परीक्षेत औपचारिक पत्रात कुटुंबाची चौकशी करतात किंवा कौटुंबिक अनौपचारिक पत्र फारच अनौपचारिकरित्या लिहितात. मग कोरडे अभिनंदन आणि पाल्हाळ चौकशीपत्रे तपासनिसांना वाचायची वेळ येते नि ४ किंवा ५ गुण देऊन मोकळे व्हावे लागते.

उताऱ्यावरचे प्रश्न हा आठवा प्रश्न देखील पाचवीच्या विद्यार्थ्यांनी लिहावा असा लिहिला जातो. वास्तविक उताऱ्यात उताऱ्याच्या मागे पुढे काही संदर्भ असू शकतात याचा विचारच होत नाही. शब्दांच्या अंतरंगातही अर्थ दडलेला असतो हे पाहिलं जात नाही. ९०% मुले तर पद्य उताऱ्याच्या नादी लागतच नाहीत. अशा प्रकारे जवळच्या रस्त्याने सर्वजण बोर्डापर्यंत पोहोचण्याचा मार्ग शोधत असतात. यात दोष कोणाचा ?

सारांशलेखनाचा नववा प्रश्न म्हणजे उतारा उतरवून काढण्याचा प्रश्न अशीच जणू काही बऱ्याच मुलांची समजूत असते. कोणी त्यातल्यात्यात काही एक आड एकची वाक्ये गाळून परिच्छेद कमी करण्याचा प्रयत्न करतात नि सारं सार संपवतात.



अनुक्रमणिका

तीन तास लिहून लिहून दमलेली मुले पेपर 'सोप्पा' गेल्याच्या समाधानात बाहेर येतात नि धक्कादायक निकालाला आणखी एक धक्का देतात.

'बुडत्याला काडीचा आधार' याप्रमाणे काही विद्यार्थी प्रश्न क्र. ८ व ९ मधील उतारे अखिल पेपरात उत्तरासारखे वापरतात. उताऱ्याचेच तुकडे तुकडे करून उत्तरे लिहितात. अशा मुलांची खरोखर कीव येते. पेपराच्या तीन तासांत काळजावर दगड ठेवून बधीर मनाने उतारे उतरवणारी ही मंडळी मनोमन पेपराच्या पहिल्याच दिवशी किती दु:खी होत असतील या विचाराने अस्वस्थता वाढते.

हे कुठतरी थांबायला हवं. यात बदल व्हायला हवा. हा बदल करण्यासाठी दुसरं कोणीतरी पुढं यायला हवं असं न म्हणता आपणच पुढं व्हायला हवं. आम्ही शिक्षकांनी अभ्यास करून वर्गात जायला हवं. कितीही वर्षांचा अनुभव असला तरी नव्याने येणारे दाखले नवोदिताप्रमाणे द्यायला हवेत. आपण अनुभवी असलो तरी विद्यार्थी अननुभवी आहेत याची जाण ठेवायला हवी. मुलांची मानसिकता लक्षात घ्यायला हवी. मुलांना सतत सक्रीय ठेवायला हवं. तासात आपण काय काय करायचं हे ठरविण्यापेक्षा मुलांनी काय काय करायचं आहे हे ठरवायला हवं. प्रत्येक पाठावर व कवितेवर १०-१० गुणांची तरी चाचणी घ्यायला हवी. अभ्यासक्रम पळवत-पळवत नेण्याची वृत्ती टाळावी. महिन्यातून एकदा तरी धावती-उजळणी घेण्याचा प्रयत्न करायला हवा. अक्षर सुधारण्यासाठी सतत सुधारणांचा भडीमार करायला हवा. लिहिताना प्रमाणभाषा वापरण्याचा आग्रह धरावा. अवांतर वाचन करावे.

- अनेकवेळा मुले गडबडीने सामान्य चुका करतात. लेखक वेगळे, आशय वेगळा आणि प्रश्नही वेगळा असं लिहितात. कशाचा कशाशी मेळ बसत नाही. एका पेपरमध्ये एका मुलाने चौकटीत प्रश्न - १, प्रत्यक्ष पानावर प्रश्न ३ (अ) सुरू केला. तो ४ ओळी लिहून सोडला त्याच पानावर ४-(ब) पुन्हा चार ओळी लिहून सोडला. त्याच पानावर प्रश्न ६(अ) मग पान उलटले ६-ब लिहायला घेतला त्यातले दोन प्रश्न बरोबर. त्याच पानावर पुढे ३-ब सुरू. नंतर सलगपणे ३अ/ब मग ४ (अ) मग ५(ब) त्यातच प्रश्न ६-ग त्यापुढे प्रश्न-८. मग सारांशलेखनाची वाक्ये आकडे घालून लिहिलेली.

अशा भुलभुलैया पेपरातून तपासनिसाला बाहेर पडणे अशक्य होते. कसे गुण मिळणार अशा मुलांना ? बालवाडीतल्या मुलांप्रमाणे १०वीचा पेपर लिहिणारी मुले १०वीपर्यंत येतातच कशी ? हा मूलभूत प्रश्न आहे. त्याचा विचार होण्याची खरी गरज आहे. उदाहरणार्थ :

'औंधाच्या राजाची गुणवैशिष्ट्ये'

''औंधाचा हा भूतकालापेक्षा वत्रमान कलापेक्षा भावेपरा काळ बरसप्र जानतनात








विद्यार्थीविर कोणतेही सुसरकार होऊ नयेत जास्त कातळी घेत असे. अीध शाळांमध्ये चलचित्रप परजा क्रयासाठी लागणारी साहित्य कोणत्या नांगणारि साहित्य असतात परजा कोणत्या प्रवासाव्या.''

अशी मुले १०वीतून वर जात नसली तरी ती वर आलीच कशी ? हा खरा प्रश्न आहे. अशा मुलांमुळेही धक्कादायक निकाल पाहण्याची वेळ येते.

पेपर तपासण्याच्या पद्धती व पेपर तपासून देण्याच्या काळामध्ये बदल होण्याचीही अतिशय गरज आहे. असंख्य पेपर आणि मर्यादित कालावधी यामुळे मुलांवर नकळत अन्याय होण्याची शक्यता असते. स्त्री-तपासनीस असतील तर कुटुंब-नोकरी-आणि-घरकाम करून रात्रपाळीने या पेपरांचा परामर्ष घ्यावा लागतो. त्यामुळेही मुलांच्या वाट्याला अन्याय येण्याची शक्यता असते.

■

हरिद्वार संजीवराजेनगर, फलटण ४१५ ५२३.
दूरध्वनी : (०२१६६) २२०२५६, २२३०४१

(१९ डिसेंबर २००४ रोजी झालेल्या चर्चासत्रात हा निबंध वाचण्यात आला. चर्चासत्राचा वृत्तान्त याच अंकातील 'परिषद-वार्ता'मध्ये पाहावा.)

**भाषा : जीवनरस**

एखादा माणूस फार थकतो, त्रासतो, त्या व्यक्तीला किंवा नात्याला पार विटतो, गांजतो तेव्हा काय म्हणतो ? 'त्याला काही सांगण्यात अर्थ नाही' किंवा 'तिथे बोलून फायदा नाही.' म्हणजे बोलणं खुंटलं की जणू तो व्यवहार, ते नातंच संपलं. अगदी छोट्या मुलालाही मारणं, कोंडणं यापेक्षा त्याच्याशी अबोला धरणं ही शिक्षा जास्त अपमानास्पद वाटते. भाषा हा जणू काही जीवनरस असतो.

**व्याकरण : भाषेच्या रहदारीचे नियम**

लोक म्हणतात, की ते भाषाबिषा एक वेळ चालेल हो, पण व्याकरणाची कटकट नको बुवा. हे म्हणजे मुलाला आपला हात सोडून चालायला शिकवताना रहदारीचे नियम शिकवण्याचा कंटाळा करण्यासारखं आहे. आपल्या मुलांना, आयुष्याच्या रस्त्यावरून कधी रमतगमत, टिवल्याबावल्या करत, कधी धापा टाकत चालायला, धावायला बळ द्यायचं असेल तर भाषेशिवाय पर्याय नाही.

**मंगला गोडबोले,** दै. सकाळ २५-५-२००६








पुस्तक-परीक्षण

# लर्निंग मराठी ॲज् अ फॉरिन लँग्विज् : नीट-नेटके, उपयुक्त

मॅक्सीन बर्नसन

[ परीक्षित पुस्तक : 'लर्निंग मराठी ॲज् अ फॉरिन लँग्विज्', भाग १ व २. डॉ. नीती बडवे. २००३, ०४. अक्षर साहित्य, पुणे. किंमत रु. ३००/- व रु. ४००/- ]

डॉ. नीती बडवे यांनी तयार केलेल्या 'लर्निंग मराठी ॲज् अ फॉरिन लँग्विज्' हा दोन भाग व दोन सीडी असा संच आहे. परदेशी भाषा शिकविण्याचा डॉ. बडवे यांना प्रदीर्घ अनुभव आहे. पुणे विद्यापीठात त्या जर्मन भाषेच्या प्राध्यापिका आहेत. शिवाय जवळजवळ दोन दशकांपासून त्या अमेरिकन व जर्मन विद्यार्थ्यांना मराठी शिकवत आहेत. सदर पुस्तकाला या अनुभवाचा भक्कम पाया आहे, हे स्पष्ट दिसते.

पुस्तक लिहिताना डॉ. बडवे यांनी निरनिराळ्या लोकांना डोळ्यांसमोर ठेवले आहे.

(१) जगभर पसरलेली मराठीवंशीय माणसे, (२) महाराष्ट्रात वास्तव्य करणारे अमराठी सरकारी नोकर, (३) महाराष्ट्रात वेगवेगळ्या विषयांचा अभ्यास करू इच्छिणारे परदेशी विद्यार्थी व संशोधक.

तसे पाहिले तर एवढ्या विस्तृत वाचकवर्गाच्या गरजा एका पुस्तकामध्ये पुरवणे हे महाकठीण काम आहे. मूलभूत व्याकरण सारखे असले तरी कोणकोणत्या संदर्भात मराठी लागणार हे त्या त्या वर्गावर अवलंबून असणार. उदा० अमेरिकेतली मराठीवंशीय विद्यार्थिनी इकडे आली तर बहुतेक वेळा स्वतंत्र खोली भाड्याने न घेता ती नातेवाईकांकडे राहणार. नातेवाईकांशी ओळख, स्वत:च्या घरच्या लोकांची माहिती व स्वत:ची माहिती (शाळा, कॉलेज, अमेरिकेतील राहणी, वगैरे) अशा गोष्टींबद्दल सभाषण करता येणे हे विशेष महत्त्वाचे ठरेल. भारतातील सरकारी नोकर असेल तर बाहेरचा व्यवहार (रिक्षा, हॉटेल, दुकान) बहुतेक हिंदीमध्ये करू शकेल. त्याची गरज म्हणजे घरातील नोकरांशी व ऑफिसमधल्या सहकाऱ्यांशी बोलण्याची. (कार्यालयातील कामकाज मराठीत करायचे असेल तर ती गोष्ट संपूर्ण वेगळी !)

या दृष्टीने सदर पुस्तक मुख्यत: परदेशी तरुण विद्यार्थ्यांना उपयुक्त आहे, असे वाटते, व त्या दृष्टीने हे परीक्षण लिहिलेले आहे.

पुस्तकाच्या पहिल्या भागामध्ये उच्चार व देवनागरी लिपीची ओळख करून दिलेली आहे. दुसरा भाग संभाषण व व्याकरण शिकविण्यासाठी आहे.

**भाग १ :** सुशिक्षित प्रौढांना भारतीय लिपीची ओळख कशी करून द्यायची, असा प्रश्न नेहमी पडतो. काही विद्यार्थी अगदी सहजरीत्या लिपी शिकू शकतात, लिपीची माहिती त्यांना दिली तर ते एक-दोन दिवसांतच ती आत्मसात करू शकतात. काहींना मात्र नवीन लिपी शिकायला फारच अवघड जाते. या दोन्ही प्रकारच्या माणसांना या पुस्तकातील देवनागरी लिपीचा परिचय कितपत उपयुक्त ठरेल, याबद्दल शंका वाटते. प्रत्येक घटकामध्ये थोडी वाक्ये दिली तरी भाग पूर्ण केल्यानंतरच संभाषणाची खरी सुरवात होते. ज्यांना लिपी सहज शिकता येईल त्यांना हा भाग कंटाळवाणा होण्याची शक्यता आहे, व ज्यांना लिपी शिकायला अवघड वाटते त्यांनाही हा भाग कठीण व कंटाळवाणा होईल, असे वाटते. अक्षरांचे वर्गीकरण आकाराप्रमाणे केल्यामुळे काठिण्य वाढते. उदाहरणार्थ पहिल्या घटकामध्ये उजवीकडे जोडलेली उभी रेष असलेली अक्षरे (न, म, य, स आणि ष) दिली आहेत. वास्तविक लहान मूल असो अथवा प्रौढ माणूस असो केवळ सूक्ष्म फरक असलेली अक्षरे लक्षात ठेवणे जास्त अवघड असते. (कानडी लिपीच्या बाबतीत मला अजूनही हीच अडचण वाटते.)

**भाग २ :** यात २१ घटक आहेत. प्रत्येक घटकामध्ये एक ते चार उतारे दिले असून त्याबरोबर त्या उताऱ्यांमधले शब्द व व्याकरणावर स्पष्टीकरण आणि व्याकरणाचा सराव दिला आहे. पुस्तकामध्ये मराठीतील जवळजवळ सर्व मूलभूत वाक्यरचना व शब्दांची रूपे समाविष्ट झाली आहेत. (फक्त ''मला मुंबईला जायचं आहे'', ''मला अभ्यास करायचा आहे'', ही वाक्यरचना आलेली नाही. ती द्यायला हवी होती.)

पुस्तकाला समान धागा देण्यासाठी ॲन ही अमेरिकन तरुणी महाराष्ट्रात सतार शिकण्यासाठी येते असे कथानक आहे. माझ्या मते संपूर्ण पुस्तक अशा ठरावीक पात्रांवर आधारित ठेवणे हे लहान मुलांच्या पुस्तकासाठी जास्त योग्य आहे. पण शेवटी हा ज्याच्या-त्याच्या आवडीचा प्रश्न असून विशेष महत्त्वाची गोष्ट नव्हे.

जास्त महत्त्वाची गोष्ट म्हणजे दिलेले उतारे कोणत्या स्वरूपाचे आहेत. नवीन भाषा शिकताना माणसाला सुरुवातीला विशिष्ट प्रसंगांमध्ये काय काय विचारले जाते व काय म्हणावे लागते हे पाठ करावे लागते. उदाहरणार्थ, ''तुम्हाला मराठी येतं का ?'', ''तुम्ही मराठी बोलता का?'', ''तुम्ही मराठी बोलू शकता का ?''. अशा प्रश्नांचा सराव असावा. सुरुवातीपासून उतारा लांब असेल तर वारंवार येणारी वाक्ये व नैमित्तिक वाक्ये यांच्यातील फरक पटकन लक्षात येत नाही. शब्द व व्याकरणासंबंधी केलेली टिपणे एकूण ठीक आहेत. कधीकधी इंग्रजी वाक्यांमध्ये 'ॲज यू मस्ट हॅव नोटिस्ड्'

("As you must have noticed,") सारखे खटकणारे शब्दप्रयोग वापरले आहेत. त्याऐवजी 'नोट दॅट' ("Note that") म्हणायला हवे होते. काही वेळा संकल्पनेचे स्पष्टीकरण व्यवस्थितपणे केलेले नाही. उदाहरणार्थ, 'मराठी नाउन्ज हॅव ऑब्लिक फॉर्म्ज, बोथ इन द सिंग्युलर अँड प्लूरल' ("Marathi nouns have oblique forms, both in the singular and plural."). अगोदर नामाला प्रत्यय लावत असताना ते नाम बदलते, व त्या बदललेल्या रूपाला सामान्यरूप 'ऑब्लिक फॉर्म' म्हणतात, असे स्पष्ट करायला हवे होते.

प्रत्येक युनिटमध्ये व्याकरणाचा भरपूर सराव दिला आहे, तो चांगला आहे. फक्त जोड्या लावण्याच्या सरावामध्ये काही वेळा अनेक पर्याय असू शकतात याची दखल घेतली गेलेली नाही. संभाषणाचा सराव मात्र पुस्तकात दिलेला नाही. त्याची खूप गरज होती. उताऱ्यांचे भाषांतर लगेच देण्याऐवजी पुस्तकाच्या शेवटी दिले आहे ते चांगले आहे, म्हणजे विद्यार्थ्याला पटकन वाक्याचा अर्थ न वाचता थोडा विचार करावा लागतो. शब्दसूचीही मागे दिली आहे. विषयांची सूचीसुद्धा दिली असती तर ती उपयुक्त ठरली असती.

**एकूण :** या पुस्तकाची मांडणी अत्यंत नेटकी आहे. निनाद माटे यांनी तयार केलेला 'अनंत' हा देवनागरी लिपीची टंक (फॉण्ट) फारच सुरेख आहे. (त्याचा मराठी पुस्तकांमध्ये जास्त मोठ्या प्रमाणावर वापर व्हायला पाहिजे असे वाटते.) फोटो मात्र विनाकारण घातले आहेत असे वाटते व काही चित्रे, विशेषतः भाग १ मध्ये, केवळ मोकळ्या जागा भरण्यासाठी वापरल्यासारखी वाटतात. दोन्ही सीडीमध्ये उच्चार अत्यंत स्पष्ट आहेत आणि ध्वनीमुद्रण पूर्ण व्यावसायिक दर्जाचे आहे. मात्र ऐकणाऱ्याला शब्द किंवा वाक्य परत म्हणण्यासाठी वेळ दिला असता तर जास्त सोयीचे झाले असते.

एकूण पुस्तक अतिशय काळजीपूर्वक केलेले आहे. मराठी मजकुराचे मुद्रण जवळ जवळ निर्दोष आहे. इंग्रजीतील चुकाही फार कमी आहेत. तीन वारंवार येणाऱ्या शब्दांचे स्पेलिंग चुकले आहे - म्हणजे honorific, o'clock व ok. मात्र एवढ्या मजकुरामध्ये तीनच चुका नगण्य आहेत असे म्हणावे लागेल. ■

**टपाल पेटी क्र. ६३, फलटण (जि. सातारा) ४१५५२३.**

**भाषा सांगते...**

पोटासाठी प्रत्येकच जण नाना गोष्टी शिकतो, करतो, पार पाडतो. हे कुठल्या काळामध्ये कोणाला चुकलंय ? पण पोट का भरायचं, किती भरल्यावर थांबायचं, आपल्यासारखाच दुसऱ्यालाही पोट भरण्याचा हक्क कसा आहे हे सगळं भाषा सांगते.

**मंगला गोडबोले,** दै. सकाळ २५-५-२००५

**पुस्तक-परीक्षण**

# वैश्विक काव्यानुभूतीची संधी : ‘पृथ्वीवरील प्रतिभावंत’

**नीलिमा गुंडी**

[परीक्षित पुस्तक : ‘पृथ्वीवरील प्रतिभावंत’, अनुवाद : भगवान ठग. २००४. महाराष्ट्र अनुवाद प्रकाशन, बुलढाणा. पृष्ठे ७६, किंमत रु. १५०/- ]

अनुवादाच्या माध्यमातून विविध भाषांमध्ये संवाद साधण्याचा उपक्रम सातत्याने राबवणाऱ्या कवी भगवान ठग यांचा ‘पृथ्वीवरील प्रतिभावंत’ हा अनुवादित काव्यसंग्रह आवर्जून नोंद घेण्याजोगा आहे. या पुस्तकात पाच खंडांतील निवडक १३९ कवींच्या १६७ कवितांचा अनुवाद श्री. ठग यांनी केला आहे. एका व्यक्तीने पूर्ण केलेला हा उपक्रम कौतुकास्पद आहे. या संग्रहात कार्ल मार्क्स, बोरीस पास्तरनाक, अलेक्झांद्र ब्लोक (रशिया), एझ्रा पाउंड (अमेरिका), तसलिमा नसरीन (बांगला देश), माओत्से तुंग (चीन), पाब्लो नेरुदा (चिली) अशा जगप्रसिद्ध व्यक्तींप्रमाणेच अभिमन्यू अनंत (मॉरिशस), नाजीम हिकमत (तुर्कस्थान), टि मो (ब्रह्मदेश) कोफी अवनोर (घाना) इत्यादी सर्वसामान्यांना सहजासहजी माहीत नसणाऱ्या अनेक कवींनाही स्थान मिळाले आहे. या कविता प्रेम, निसर्ग, युद्ध, राजकारण, अध्यात्म अशा विविध जीवनानुभवांविषयी तरल प्रतिमांच्या माध्यमातून भाष्य करतात. या कविता वाचताना विविध भौगोलिक परिस्थिती, विविध संस्कृती यांच्या गाभ्याशी असलेले जगण्याचे एकात्म रूप जाणवत राहाते. कविता आकाराने लहान निवडण्याच्या निर्णयामुळे संग्रहाला काही मर्यादा पडलेल्या दिसतात. तरीही एका कवितेत म्हटल्याप्रमाणे - ‘‘कविता निर्वात वर्तुळातून खुली करतेय हिर्वीगार पठारं तुमच्यासाठी प्रत्येक माणसात’’ (‘कविता’ सैंडसे के. ओबर्ग, पृ. ६४), हा अनुभव सुखदच आहे.

संग्रहाच्या शेवटी सर्व कवींची अगदी मोजक्या शब्दांत माहिती दिली आहे. त्यात काहींची माहिती जुजबी आहे, हे खटकते. तसेच या कविता कोणत्या पुस्तकांतून निवडल्या, त्याविषयी दिलेली माहिती नाही. अनुवाद करताना काही शब्दरूपे चुकीची वाटत राहतात. उदा० पावित्रे, प्रपंच्यावर, निहंग संगीत (पृ. ५९), (पृ. ६७), (पृ. ६३) रचनेतही थोडा सफाईदारपणा हवा होता. मात्र या कामाचा आवाका आणि महत्त्व लक्षात घेता या पुस्तकामुळे मराठी साहित्यात चांगली भर पडली आहे; इतकेच





अनुक्रमणिका

नव्हे तर, मराठी भाषेच्या संवेदनशक्तीतही यामुळे भर पडली आहे; असे म्हणायला हवे. या पृथ्वीवरच्या प्रतिभावंतांमध्ये एखादा भारतीय कवी असायला हरकत नव्हती. कविताप्रेमी व अभ्यासकांनी हा ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्त्वाचा संग्रह जरूर वाचायला हवा. ■

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, पुणे २

## भाषाभिवृद्धी

बऱ्याच वर्षांपूर्वी श्री. म. माट्यांनी 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' अशा नावाचा लेख लिहिला होता. माट्यांचा मुद्दा असा होता, की हौशी बोलणारा किंवा लिहिणारा आपल्या बोलण्यात किंवा लिहिण्यात सरसपणा आणण्यासाठी रूपकांचा उपयोग करतो. ही रूपके परीचित असतील तर ती त्याच अर्थाने भाषेत रूढ होतात. उदाहरणार्थ, पूर्वी पोथ्या लिहिताना एखादा शब्द नको असेल तर त्याच्यावर हरताळीचे चूर्ण लावत. ते फासले म्हणजे अक्षर थोडे दिसत असले तरी ते खोडलेले आहे असे समजण्याचा प्रघात होता. याच समजुतीने एखाद्याने दुकाने किलकिली ठेवून बंद पाळला हे सांगण्यासाठी हरताळ फासला हा शब्द पहिल्यांदा वापरला असावा. आता हरताळीचे चूर्ण मागे पडले तरी हरताळ फासणे आणि हरताळ पडणे शिल्लक आहेत. माट्यांनी आणखीही काही उदाहरणे दिली होती. तिय्या देणे, इंगा दाखवणे इत्यादी. रंधा मारताना फळी सरकू नये म्हणून सुतार खालच्या लाकडावर ज्या आडव्या पट्टीला ती अडकवतात तो ठिय्या. नवे कातडे नरम करण्यासाठी वापरलेली लोखंडाची सळी, तो इंगा माट्यांच्या काळी 'इंगा फिरवणे' असा शब्दप्रयोग असावा. आता आपण म्हणतो, 'इंगा दाखवणे'. तो दाखवला, की समोरचा नरम पडलाच. माटे पुढे म्हणतात, की मराठी भाषा जर समृद्ध व्हायची असेल तर निरनिराळ्या पेशांतल्या, धंद्यांतल्या माणसांनी लिहिते व्हायला हवे. जो तो आपल्या धंद्यातले शब्द आणेल. समाजाच्या सगळ्या थरांमध्ये लिहिण्या बोलण्याचा व्यवसाय फैलावला म्हणजे शब्दांची भरभराट होईल.

गेल्या वीस-पंचवीस वर्षांत लिखित मराठीत पडलेली शब्दांची भर पाहिली, की माट्यांचे म्हणणे किती खरे होते ते समजते. दलित साहित्याच्या सुरवातीच्या रेट्यात 'शब्दांचे अर्थ समजत नाहीत' असा ओरडा झाला. 'समजत नसेल तर वाचू नका' अशी प्रत्युत्तरे झाली. सुदैवाने अभिनिवेशातून आपण बाहेर आलो. 'गोलपीठा'पासून 'आयदान'पर्यंत, 'गोतावळा'पासून 'बारोमास'पर्यंत अनेक नवे शब्द मराठीच्या मुख्य प्रवाहात येऊन दाखल झाले आहेत. ■

'वाग्वैजयंती', दै. सकाळ, २२-०५-०५








पुस्तक-परीक्षण

# प्रादेशिकता असूनही फक्त प्रादेशिक नसणारी कादंबरी

हेमंत कर्णिक

[परीक्षित पुस्तक : 'आपुलाचि वाद', मोहन कडू. २००४. साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे : १५२, किंमत १२०/- रुपये]

मोहन कडू यांच्या या कादंबरीला 'एक ताकदवान प्रादेशिक कादंबरी' म्हणणं अगदी शक्य आहे. कारण कादंबरी विदर्भातल्या एका लहान गावात घडते आणि जवळ जवळ सर्व पात्रं जवळ जवळ सर्वकाळ मराठीच्या वैदर्भी बोलीत बोलतात. इतकंच नव्हे, तर निवेदनात सुद्धा विदर्भातील संज्ञा, वाक्प्रचार यांचा सढळ वापर आहे. यातली एक कविता देखील या बोलीत आहे. तेव्हा ही कादंबरी 'ग्रामीण' किंवा 'प्रादेशिक' ठरवून टाकणं सोयीचं आहे.

पण तसं केलं, तर कादंबरीवर अन्याय होईल. ज्या कादंबरीचं प्रयोजन ग्रामीण किंवा प्रादेशिक वास्तवाची मांडणी करण्याचं, त्या वास्तवाच्या एका वा अधिक वैशिष्ट्यांकडे वेधण्याचं असतं; तिला अशी लेबलं लावली जावीत. कादंबरीची भाषा प्रमाण भाषा नाही, किंवा प्रमाण भाषा बोलणाऱ्यांच्या जगात कादंबरी घडत नाही, हे तिच्या वर्गीकरणाचं कारण असू नये.

सगळ्यात अगोदर हा मुद्दा मांडावासा वाटला, याचं कारण अर्थात कादंबरीचं हे वैशिष्ट्य ठळकपणे जाणवतं, हेच आहे. कडूंना वास्तव मांडायचं आहे आणि वास्तव प्रादेशिक आहे, हे तर खरंच. पण त्यांची भाषा इतकी सशक्त आहे, की ती विचार-विकार व्यक्त करण्याचं एक रसरशीत माध्यम, अशीच भावते. ती प्रादेशिक आहे, ग्रामीण आहे, असं सुचण्यापेक्षा मनावरून अतिपरिचयाने गुळगुळीतपणे घसरणाऱ्या प्रमाण भाषेपेक्षा ती वेगळी आहे, अधिक प्रत्ययकारी आहे, ताजी आहे; ही जाणीव जास्त प्रमाणात होते. विदर्भात काही शब्दांची लिंगं बदलतात, काही क्रियापदं वेगळी 'चालतात'. एरवी हे वेगळेपण जेव्हा ग्रामीण म्हणून येतं, तेव्हा ते 'अशुद्ध' असं सुद्धा मानलं जातं. कडूंच्या भाषावापरातल्या सातत्यामुळे या भाषावापराचे नियम वेगळे आहेत, असं होतं; भाषा अशुद्ध आहे, असं होत नाही.





अनुक्रमणिका

''याले म्हंतेबा पाटील ! उद्धवराव, काही गोष्टी घरातल्या आपल्यालेयी मालूम कायी पायजे. सारंच मानसायच्या भरोशावर नायी येत टाकता.'' (पान १५) हे तोंडी उद्‌गार आहेत; पण 'आपल्यालेयी', 'मानसायच्या किंवा कायी', 'नायी' अशा रचना सातत्याने आल्या, की त्या 'अशुद्ध' रहात नाहीत. 'वेगळ्या' होतात. म्हणजेच भाषेचं हे वेगळेपण न्यून ठरत नाही.

''केवढा बामनाऊ, जिभीले आट देऊ देऊ बोले रे पोरगं.'' (पान ५५) यात आट या शब्दाकडे लक्ष देण्यापेक्षा 'जिभीले' आणि 'बामनाऊ' या रचना पहाव्यात. 'देऊ देऊ' हा प्रयोग पहावा.

''हेच आहे एकमेव समाजसेवा करणारे !'' (पान १२९) यातलं क्रियापद कर्त्याला अनुसरून अनेकवचनी होत नाही.

हे वैशिष्ट्य भाषेपुरतं मर्यादित न राहता संपूर्ण संस्कृती समोर आणतं. पहिल्याच पानावर (पान ५) परकोट, मयाली, शेणाचे पुंजाने, काडीकचरा असे शब्द येतात. 'समोरच्या उखरलेल्या रखरख सायवानात बैठक होती, मानवाईक लोकांची !' किंवा 'फाटक्या वाकळीत हेच तेवढं ठिगळ उरलंय उसवायचं !... नुसत्या हात लावण्यानंही सारी वाकळ उभी तराडून येते की काय...' (पान ६) या रचना प्रादेशिकपणाची उदाहरणं असण्याबरोबर इंग्रजी, पश्चिमी प्रभावाची छाया नसलेल्या मराठी संस्कृतीची साक्ष देखील देतात.

पान ११९वर वर्णन आहे : ''तो अलगद खाटेच्या गासावर बसला. कुठं थोडं अंग मोकळं केलं तर कडकन खाट बसेल की काय अशी अवस्था होती. पण थोड्यातच नारळाची दोरी त्याला रुतायला लागली. तो तसाच मागं सरकला पण एकदम काही दोरीचा आधार त्याला गवसला नाही. ठाव्याला धरून तो हलकेच खाटेत धसायला लागला.'' एका खाटेवर बसण्यातून किती 'संस्कृती' व्यक्त होते आहे ! कालपरत्वे खाट गायब होत चालली तरी या प्रतिमा वाक्प्रचारात रहायला हव्यात.

म्हणी आणि वाक्प्रचार म्हणजे भाषेतलं सांस्कृतिक संचित. ''हे मोठी चवन्याची. घरमे नयी जवारी आनं अम्मा पुऱ्या पकारी'' आणि ''समजे ना उमजे'' (पान २७), ''म्हातारपणात लंगोट ढिली करून राह्यला'' (पान १३५), ''गेल्या साली असंच बार चांगला आहे करून हरिकलो तं गारपिटीनं पार लंबे केलं'' (पान ७३) अशी उदाहरणं पानापानावर आहेत. विदर्भाबाहेरच्या वाचकाला त्यातली काही अपरिचित वाटतील ('तू लेकाचा असा भांबा खाऊन काऊन उठतं ?' - पान ७३, 'एवढा कायचा लेकाचा पोमा पाडाचा ?' पान ६१); पण आपली भाषा जगण्यातले तपशील आणि विचार-विकार प्रकटन याबाबतीत किती समृद्ध आहे, याचा साक्षात्कार

यातून होत राहतो. पुरुषांच्या तोंडात शिव्या असतात. आणि त्या सहसा आयाबहिणींचा उद्धार करणाऱ्या असतात. कडूंचे पुरुष ''बहिनमाय पडतयी नायी'' (पान १००) किंवा ''बहिनमायऽ का करावं कायी समजतच नायी बा.'' (पान ६३) अशा पद्धतीने उद्‌गारात कुठेही एक अलिप्त अव्यय म्हणून आईबहीण आणतात.

आपलं संचित म्हणजे नेमकं काय, हे समजावून सांगण्याचं काम या कादंबरीची भाषा करते.

सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे भाषावापर हे या कादंबरीचं एक सशक्त अंग असलं, तरी ग्रामीण-शहरी अशा भेदातून भाषा आणि संस्कृती यांचं अद्वैत दाखवण्याचा प्रयोगही इथे आहे. उद्धवरावांच्या वडलांच्या मृत्यूच्या 'तिसऱ्या दिवसा'चा जंगी सोहळा पार पडत असताना त्यांना कॉलेजातल्या अनुराधाचे उद्‌गार आठवतात : ''तुझं फ्यूडल फॅमिली बॅकग्राउंड मात्र तुझ्या रस्टिसिटीच्या मागून उसळून येतंच बघ, उद्धव.'' (पान १२). या विधानात विचार जरूर आहे; पण त्याबरोबर शब्दांच्या निवडीतून विधानकर्तीची सांस्कृतिक पार्श्वभूमीही स्पष्ट होत आहे. यावर खवळून तरुण उद्धव चोख उत्तर देतो, ''आन तुहे कम्युनिस्ट क्रेडेंशल्स म्हंजे तुहा श्रीमंत कम्युनिस्ट मावसाच का नायी ?'' दोन्ही विधानांमधून वाचकाने तिसरं लक्षात घ्यायचं आहे, की दोघेही आपापल्या वागण्याबोलण्याचा खुलासा करत नाहीत; मुद्दा दुसऱ्यावर ढकलत आहेत. मुळात, उद्धवरावांना अनुराधाच्या उद्‌गारांची आठवण एका अस्सल 'फ्यूडल' समारंभाच्या वेळीच झाली आहे.

इंग्रजी शब्द खुशाल स्वीकारावेत. त्यामुळे भाषा बिघडत नाही, असं सांगणारं एक आडवळण सुद्धा इथे आहे :

''तुमाले येल पाडून मोठं चांगलं येते बोलता. वाचाबिचाचं काम नायी. येल पाडून इंग्रजी बोलन्याच्या भांडवलावर बरी चालते तुमची इलिट बुद्धीवाद्याची दुकानदारी. मी कायी तुह्यासरका कॉनव्हेंटब्रेड नायी. आपलं म्हंजे बॉर्न अँड ब्रॉट अप इन रिंगनाबोडी तालुका म्हसेपठार आहो.'' (पान १३)

मोहन कडू प्रादेशिक, ग्रामीण भाषा वापरत असतील; पण ती त्यांची निवड आहे; मजबुरी नाही. भाषेचा विशिष्ट बाज 'शुद्ध' ठरवण्यातला सांस्कृतिक कावा त्यांना बरोबर कळलेला आहे !

(भाषेविषयी आणखी एक बारीकसं : पान १८ वर पारबताबाई येते आणि स्वत:ची कैफियत मांडते. शहरी, प्रमाण भाषेच्या परिघात वावरणाऱ्यांनी ती आवर्जून डोळ्यांखालून घालावी. ग्रामीण बोलीत सुद्धा वय, आर्थिक-सामाजिक स्तर, यांनुसार भेद असतात !)

---

पण फक्त याच कॉन्व्हेंटब्रेड अनुराधाला उद्धवचं सतारीचं खूळ माहीत होतं. कादंबरीच्या सुरुवातीला उद्ध्वस्त गढीच्या वर्णनात कोपऱ्यातली सतार अजूनही आपला तोरा राखून आहे असा उल्लेख आहे. इलिट आणि गावरान, अशा दोन्ही प्रकारच्या भारतीय कम्युनिस्टांचा कस संशयास्पद आहे, हे सुचवून भाषा, संस्कृती, सामाजिक संघर्ष, अशा घटकांपलीकडे माणसाच्या घडणीत आणखी काहीतरी असतंच, असं सुद्धा लेखक सांगून जातो.

एक सांगताना त्याच्या कडेवर बसवून आणखी काही तरी सांगण्याची लकब कडूंनी कादंबरीभर ठेवली आहे. यातून आशय गडद, जिवंत होतो आणि गोष्टीचा आस्वाद अनेक अंगांनी घेता येतो, ही कादंबरी अनेक बाजूंनी उलगडत जाते. एका बाजूने ती उद्धवरावांच्या वाताहतीचं कथानक सांगते. दुसरीकडे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू एकानंतर एक समोर आणते. आणि त्याच वेळी उद्धवराव व त्यांचा मुलगा अभी यांच्या माध्यमातून सामाजिक संक्रमण मांडते. हे करत असताना ती उद्धवराव या पात्राविषयी सहानुभूती जरूर बाळगते; पण त्यांची पक्षपाती होत नाही.

कादंबरीचं पहिलं प्रकरण आपल्याला उद्धवरावांची ओळख करून देतं. एके काळी संपन्न असलेली त्यांच्या गढीची. आता पडझड झाली आहे. उद्धवराव तोल सांभाळणं मुष्किल व्हावं इतकी दारू पितात. सामाजिकदृष्ट्या खालच्या स्तरावर असणाऱ्यांच्यात निवांतपणे वावरतात. त्यांच्याशी संवाद साधू शकतात. पण तरी त्या इतरांच्या मनात मात्र सरंजामी इमानच जागतं. बरोबरीचं नातं निर्माण होत नाही.

दुसऱ्या प्रकरणाची सुरुवात खूप वर्षांपूर्वी उद्धवरावांचे वडील वारले, त्याचा तिसरा दिवस साजरा होत असण्यातून होते. वडिलांच्या काळात गढीत सुबत्ता आणि सरंजामी रुबाब होता, याचे तपशील प्रत्यक्ष मांडण्यात वेळ न घालवता, त्या काळाच्या नॉस्टाल्जिक आठवणी लोकांच्या तोंडून येतात. उद्धवरावांच्या दोन स्थितींमधला फरक, ठळकपणे वाचकाला जाणवून देण्याचं काम हे प्रकरण करतं. तेवढ्यात लेखक पुन्हा एक उडी मागे घेऊन वर वर्णन केल्याप्रमाणे अनुराधा, कम्युनिस्ट निष्ठा, डोस्टोव्हस्कीपर्यंतचं वाचन, सतार, कविता, वगैरे सांगतो. त्यातच कमलाकर हा आश्रित (?) कसा धोरणीपणाने अव्यवहारी उद्धवरावांना हलकेच बाजूला करून मालमत्तेचे व्यवहार ताब्यात घेतो, हे कळतं. उद्धवरावांचे वडील आण्याजी यांची पूजा, त्यांनी मारलेला वाघ, अशा गोष्टींचा सुद्धा उल्लेख येतो.

तिसऱ्या प्रकरणापासून कथानक पुढे सरकू लागतं. कथानकाचा प्रवाह सरळ सुरू झाला, तरी तो एकरेषीय, एकपदरी राहात नाही. सुरुवात घरातून न होता रोजच्या ठिय्यावर होते. उद्धवरावांना घरच्यापेक्षा हे लोक जास्त जवळचे वाटतात, हे यातून

सुचवलं जातं. ते सामाजिक-सांस्कृतिक दृष्टीने त्यांच्यापेक्षा खालच्या लोकांशी किती सहज मिसळतात, हे सांगितलं जातं. एका गरीब, व्यवस्थेने नाडलेल्या म्हातारीला अडचणीतून सुटण्याचा नामी मार्ग उद्धवराव सांगतात. (तेवढ्यात तीन कष्टकरी बायका आकड्यावर पैसे लावतात. उद्धवरावांची, म्हणजेच कुठल्याही सामाजिक जाणिवेच्या कामाची, एक मर्यादा स्पष्ट होते.) तोच युवराज येतो. हा शेवंताचा, त्यांनी ठेवलेल्या बाईचा मुलगा. अंगात मळकं कुडतं, पायघोळ पायजमा, गळ्याभोवती काटला गमछा अन पायात रबरी चपला अशा मूर्तिमंत दारिद्र्य अन लाचारीच्या रूपात हे त्याचं वाचकाला होणारं प्रथम दर्शन. घामाने चिकट झालेल्या त्याच्या कुडत्याचा तो विसविशीत स्पर्श उद्धवरावांना ओंगळ वाटला नाही (पान २१) असं जरी लगेच आलं, तरी मनात जागलेल्या अपराधी भावनेपोटी उद्धवराव उसने पैसे घेऊन युवराजच्या खिशात कोंबतात. एका बाजूने उद्धवरावांची, इतरांसाठी स्वत:ला तोशीस लावून घेणारी अशी काहीशी उच्च जीवनमूल्यं कळता कळता त्याच मूल्यांनुसार ते स्वत:च स्वत:ला अपराधी मानतात, हे सुद्धा सूचित होतं.

या प्रकरणातच वाचकाची उद्धवरावांच्या कवितेशी ओळख होते. या कादंबरीचं निवेदन प्रथमपुरुषी नाही. ते पूर्णपणे उद्धवरावांच्या सोबत चालते, असंही नाही. उलट, याच प्रकरणाच्या शेवटी ते उद्धवरावांना सोडून शेवंताच्या घरी जाते : ''तिनं त्या चुरगाळलेल्या नोटा हळुवार आपल्या बोटानं सरळ केल्या, घामानं चिकट झालेल्या त्या नोटांमधून पाटीलसायेबाच्या हाताचा काही सुगंध आलाय असं तिला वाटलं. वयं वाढली तरी मनाचं ओढाळपण काही जात नाही...'' (पान २५) असं शेवंताचं मन वाचकाच्या समोर येतं.

उद्धवराव अपयशी ठरले. त्यांचे वडील एक आख्यायिका बनून राहिले आहेत. या वडिलांचा सरंजामी वारसा मिळून देखील उद्धवराव समतावादी, मार्क्सिस्ट आहेत; ते कविता करतात, सतार वाजवतात; घरची इस्टेट राखण्यात आणि उपभोगण्यात त्यांना रस नाही, असं पहिली दोन प्रकरणे सांगतात. त्यानंतर येतं उद्धवरावांचं घर. त्यांची मुलं, मुलांची आई यांचं नातं घट्ट, जिव्हाळ्याचं आहे, हे संभाषणाच्या पद्धतीवरून दिसतं; तर संगीता हट्टी आणि स्वार्थी आहे, घरात पैशांची ओढग्रस्त आहे, हे संभाषणातल्या तपशिलांवरून कळतं. उद्धवरावांचे मेव्हणे संतोषराव येतात. गांधीवादी, म्हणजे साधनशुचितावादी संतोषराव आणि कष्टकऱ्यांच्या हिंसेचं समर्थन करणारे उद्धवराव यांचा वाद होतो; आईला निकडीच्या वाटणाऱ्या मुलाची नोकरी आणि मुलीचं लग्न या गोष्टींची तड लागत नाही आहे, हे समोर येतं.

पुढच्या प्रकरणात उद्धवरावांच्या साहित्यिक अंगाची ओळख होते आणि स्वत:ची








प्रतिभा ही त्यांच्यासाठी हळव्या अभिमानाची गोष्ट असली, तरी तिच्या नादात ते सामाजिक जगण्याच्या व्यवहाराला दुय्यम लेखायला तयार नाहीत, हे लक्षात येतं.

या नंतरचं प्रकरण उद्धवरावांची बायको एका बुवाकडे जाते, हे आहे. बुवाच्या ओंगळ, अर्थहीन वागण्याबोलण्याला अभी हा उद्धवरावांचा अंधश्रद्धा अजिबातच न मानणारा मुलगा साक्षी आहे. त्याच्या नजरेतून आपण पाहतो. उद्धवरावांच्या व्यक्तिमत्त्वाचे बरेच पैलू वाचकाला ज्ञात झाल्यावर हे प्रकरण त्यांच्या लौकिक मूल्याला चौकट देतं. त्यांच्या सहनशील आणि धीराच्या पत्नीला त्यांच्याकडून इतकी कमी अपेक्षा आहे, की आंधळ्या दैववादाला शरण जायला तिचं मन तयार आहे !

गोष्ट पुढे सरकतेच आहे; पण उद्धवरावांची मूर्ती देखील आकार घेते आहे. हे प्रकरण अगोदर येऊन चालेल का ? नाही चालणार ! हा माणूस असा असा आहे, त्याच्या अंगी इतक्या कळा आहेत; हे सांगून झाल्यावर लौकिक यशाच्या बाबतीत मात्र तो दुबळा आहे, असं सांगणं उरतं. हे काम या प्रकरणात होतंच; पण इतका वेळ शहाण्या सुरत्या लोकांमध्ये वावरणारी कादंबरी अचानक अतर्क्य निरर्थकतेत डचमळते आणि सगळ्या शहाणपणाची परिमाणं संशयास्पद होऊन जातात. तुम्ही कितीही शहाणे असा; साध्या चाकोरीतल्या जगण्याची जबाबदारी जर तुम्हाला उचलता येत नसेल, तर तो शहाणपणा बिनकामाचा ठरतो, असा हा संदेश आहे. व्यक्तिसापेक्ष श्रेष्ठकनिष्ठ गुणवत्तेपेक्षा मूलभूत गरजांना प्राधान्य देणाऱ्या साम्यवादाचे पुरस्कर्ते असणाऱ्या उद्धवरावांच्या बाबतीत तर हा संदेश जास्त भीषण ठरतो.

उद्धवरावांच्या जीवनमूल्यांमध्येच कशी गफलत आहे, हे कादंबरीकाराने देवानंद या पात्राच्या द्वारे स्पष्ट केलं आहे. देवानंद बौद्ध आहे. त्याचा उल्लेख अगदी प्रथम येतो, तोच मोठा सूचक आहे. तो अंगमेहनतीच्या कामांनाही मागे हटत नाही. नाहीतर दुपारी तीनपासून रात्री अकरापर्यंत भवरीसेठच्या दुकानात सट्ट्याच्या पट्ट्या लिहितो. (पान १७) उद्धवरावांना मानणारा, ते आपल्याला मानानं वागवतात, याविषयी मनी कृतज्ञता बाळगणारा देवानंद जगण्याच्या व्यवहारात त्यांचा आदर्शवाद जपत नाही ! या त्याच्या स्वतंत्र विचारबुद्धीचं उद्धवरावांना कौतुक आहे, त्याच्या जगण्यातल्या मर्यादांची जाणीव देखील त्यांना आहे. पण देवानंद कधीही वेगळी वाट सुधरू शकतो, हे त्यांच्या मनावर स्वार झालेल्या आदर्शवादाला सुचलेलं नाही. मोर्च्यात लाठीमार होत असताना त्याने स्वत:च्या शरीरावर लाठ्या झेलून उद्धवरावांचं रक्षण केलं आहे. पण सीतारामसारखा तो त्यांचा 'कमिटेड' अनुयायी नाही. देवानंद विचारी आहे, हुशार आहे, म्हणूनच त्यांना त्याचं जास्त कौतुक आहे. हा देवानंद विजूसारखं विश्वासाचं माणूस जेव्हा चौकशी करतं, तेव्हा काय म्हणतो ?

‘‘तो जेवढा इमानदार, माह्या डोक्यात तेवढाच फितूर आहे धसून... पाटीलसायेब तं बाप आहे आमचा, पर... त्यायच्या मागं राह्यन्यात जान नायी वाटून राह्यली. पाटीलसायबाच्यानंच भरीस पडलो, मोर्च्यात गेलो, डंडे खाल्ले. पर माही नायीच हे लढाई. ... सीतारामच्या पोरीच्या लगनात यायनं गुपचाप घरची कालवडच विकली आन आपल्या बोटातली पाचा माशाची मुदीच देल्ली काहाडून. हे कायी आपल्याले पटलं नायी. पर सांगतो कोनाले ?... तुमी मले बइमान म्हना विजूभाऊ. पर अदिक धरून नायी ठिवता याचं आपल्याले.’’

घरची परिस्थिती बेतासबात असताना परक्या गरजूवर उपकार करायची इच्छा धरणे, याला फ्यूडल वृत्ती म्हणावं का ? की यात वैयक्तिक संपत्तीचा अधिकार नाकारणारा, संपत्तीचं समान वाटप करू बघणारा मार्क्सवाद पहावा ? बायको, तीन मुली आणि एक मुलगा अशा कुटुंबाच्या कर्त्या पुरुषाचं कुटुंबाप्रती काही कर्तव्य आहे की नाही ? कुटुंबाच्या गरजा आणि बाहेरच्या गरजू गरिबाच्या गरजा आपण एका मापाने मोजत नाही ! कुटुंबाला झुकतं माप देतो. सामाजिक स्तरानुसार भेदभाव ज्याला अंतर्यामी मान्य नाही, अशा तत्त्व आणि आचरण यात खरोखरच भेद न बाळगणाऱ्या एकसंध व्यक्तीशी प्रामाणिक रहायला नकार का असावा ?

हिंदुस्थानात जन्मलेल्या व्यक्तीच्या काळजात मार्क्स किती आणि सरंजामी परंपरा किती, हे कसं मोजायचं ?

‘आपुलाचि वाद’ ही कादंबरी आहे. तात्त्विक निबंध नाही. कादंबरीत जिवंत पात्रं असतात, अमूर्त मांडणी नसते. देवानंदला जेवढं कळतं, तेवढं तो बोलून दाखवतो. वेळ येते तेव्हा निघून जातो. त्याच्या शांत, विचारी व्यक्तिमत्त्वावर भाळलेल्या उद्धवरावांना धक्का बसतो. त्यांची उमेद खचते.

उद्धवरावांचा मुलगा अभी त्यांच्याबद्दल म्हणतो, ‘‘आपले बापलोक बरे होते. खा, प्या, बापजाद्याच्या नावानं खपून जाये. इस्टेटी राह्ये. विकलं वावर का कर लग्न, विकलं वावर का कर तेरवी. सारा घोर आपल्या मागे आहे जसा. शिका, नवकरीच्या मागं लागा, घरचं पाहा, येणारा जाणारा, फुकटचा मोठपणा दाखवा...’’ (पान ६५)

‘‘हे मार्क्सवादी. घरदार, बायकापोरं सोडसाड करून चोवीस तास खालच्या लोकायबरोबर झिंगत राहचं हे ह्यायचं डिक्लास होणं !...’’ (पान १२९)

उद्धवरावांची मोठी मुलगी संगीता ट्रान्झिस्टरवर गाणी ऐकते. चैन करू बघते. सरळ सरळ आप्पलपोटी वागते. पण हं तिचं बंड आहे. पुरुष अभीला सामाजिक चौकटीने कुटुंबाच्या जबाबदारीचा भार उचलायला लावला असला, तरी घरात अडकलेल्या बाईसारखा त्याचा कोंडमारा होत नाही. आणि जेव्हा वेळ येते, तेव्हा








संगीता अभीच्या पलीकडे बेदरकार होते !

मानवी जगण्यात भौतिक वास्तवापेक्षा भावनिक पडसाद जास्त बोचरे, खरे ठरतात. संध्या लहान आहे, ती हतबल होणे म्हणजे भविष्यात जणू अंधार होणे.

आरंभी उद्धरावांच्या नजरेतून बघणारी कादंबरी हळूहळू अभीकडे सरकत जाते. उद्धवरावांची पत्नी, त्यांची बहीण, असे दृष्टिकोण मांडता मांडता एकदा एका साहित्यिक जाणिवा बाळगणाऱ्या साध्या कवीची नजर अनुसरते. मग निवेदनात संवाद कमी होतात. विश्लेषण वाढतं. भाषा थोडी 'साहित्यिक' बनते.

कादंबरीला वर नेणारी आणखी एक गोष्ट म्हणजे लेखकाने उपमा-दृष्टांतापेक्षा वास्तवातल्या प्रतिमांवर दिलेला भर.

पान ६२ वरून पुढे अभी आणि त्याचा त्याच्याचसारखा मित्र यांचा प्रसंग आहे. उन्हाचं, त्यातल्या काहिलीचं, त्या काहिलीत पाणी भरण्याचं काम मोलावर करणाऱ्या म्हाताऱ्याचं वर्णन आहे. पान ११८ वर अभी नागपूरला जातो, ते वर्णन आहे. या दोन्ही वेळचं वातावरण वेगवेगळ्या प्रकारे असह्य आहे. त्या उग्र, नकारात्मक वर्णनातून अभीची पार्श्वभूमी तयार होते. वास्तवाची धग अभीला पोळते. ती त्याला नाकारता येत नाही. पहिल्या वर्णनात धग आहे आणि अभीचा त्रागा आहे. दुसऱ्या वर्णनात बकाल घाण आहे; पण त्रागा नाही, परिस्थितीचा स्वीकार करण्याचं धैर्य आहे.

व्यवहारशून्य नायकाचा शेवट अनिवार्यपणे शोकांतिक असावा का ? की उलट, तत्त्वनिष्ठ ध्येयवादाचा पुरस्कार करणारा, आशावादी असावा ? ही कादंबरी बहुतेकदा पात्रांच्या तोंडून, घटनांमधूनच बोलते. सगळं ढासळत चालल्यावर अभीला अपरिहार्यपणे जबाबदारी उचलावी लागते आणि कडवट शब्दात तो बापाला बोल लावतो, यात वाचकाला काही अनपेक्षित नसतं. पण क्षोभ उसळून झाल्यावर शेवटी अभीचे शब्द येतात, ''तू कायी चिंता नको करू. सारं होईन ठीक. या पोट्टीपेक्षा तो लियाकतच जास्त समजदार आहे.'' (पान १३०)

आणि शेवट निराशा व्यक्त न करता आशावादीच होणार, हे स्पष्ट होतं. शेवट नाटकी वाटतो, हे खरं; पण त्यातला आशावाद खोटा वाटत नाही.

सामाजिकतेचं भान राखताना मानवी व्यक्तिमत्त्वातल्या व्यामिश्रतेची जाणीव न विसरणारी; ग्रामीण बोलीभाषेचा सढळ वापर करताना संकुचित अर्थाने ग्रामीण न होणारी; मोठ्या डौलाने देशीयता मिरवणारी आणि शैलीदारपणाचा बोल लावून न घेता अजोड रचनाकौशल्य दाखवणारी ही कादंबरी वाचून फार फार वाटतं, की तिच्या कर्त्याशी, मोहन कडूंशी बोलायला मिळायला हवं होतं. ■

'सर्च', शोधग्राम, पोस्ट गडचिरोली ४४२६०५.

**पुस्तक-परीक्षण**

# अहिराणी म्हणींचा प्रेरक अभ्यास

दिलीप धोंडगे

[परीक्षित पुस्तक : 'अहिराणी म्हणीतील समाजभाषा', डॉ. म. सु. पगारे. २००२. प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे : ११५, किंमत ९०/- रुपये. ]

'अहिराणी म्हणीतील समाजभाषा' हा डॉ. म.सु. पगारे यांनी लघुशोधप्रबंधाच्या निमित्ताने केलेला अभ्यास पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला आहे. समाजभाषाविज्ञानाच्या अंगाने अभ्यास करण्याचे उद्दिष्ट ठेवून हा अभ्यास केलेला आहे. पुस्तकाच्या दुसऱ्या भागात ज्या निवडक म्हणींचे विश्लेषण डॉ. पगारे यांनी केले आहे, त्यांत समाजभाषाविज्ञानाची दृष्टी स्वीकारल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे. प्रारंभी ''दोन शब्द'' लिहिणाऱ्या डॉ. रमेश सूर्यवंशी यांनी या म्हणींच्या अभ्यासातून 'समाजभाषा' ही संकल्पना प्रथमच मांडण्याचा मान डॉ. म.सु. पगारे यांना जातो असा दावा केला आहे. ('समाजभाषा' म्हणजे नेमके काय असा प्रश्न पडतो.) काही प्रातिनिधिक म्हणींचे जे विश्लेषण डॉ. पगारे यांनी केले आहे, त्याबद्दल डॉ. सूर्यवंशी म्हणतात की : '...काही प्रातिनिधिक म्हणींचे नमुने घेऊन त्यांतील प्रत्येक म्हणीचा वाच्यार्थ आणि त्याखाली त्या म्हणीचा लाक्षणिक अर्थ किंवा समाजभाषेतील अर्थ दिला आहे.'' याचा अर्थ समाजभाषा म्हणजे लाक्षणिक अर्थ सूचित करणारी भाषा असा घ्यायचा का ? पण डॉ. सूर्यवंशी म्हणतात, ''...समाजभाषेतील अर्थ ही संकल्पना लाक्षणिक अर्थ या संकल्पनेहून विशाल असल्याची जाणीव या म्हणींच्या लोकभाषेतील अर्थ वाचताना वाचकांच्या लक्षात येईलच.'' समाजभाषेतील अर्थ हा लोकभाषेतील अर्थ असल्यामुळे तो लाक्षणिक अर्थ या संकल्पनेहून विशाल ठरतो असा याचा अर्थ घ्यावा लागेल. समाजभाषा, लोकभाषा या संकल्पना पुरेशा स्पष्ट होत नाहीत; त्यांचे स्वतंत्र अस्तित्व मानायचे का हा प्रश्न अनुत्तरितच राहतो. लेखकाला म्हणींचा सामाजिक भाषाविज्ञानाच्या अंगाने अभ्यास करायचा आहे हे उद्दिष्ट ध्यानात घेऊन प्रस्तुत ग्रंथाचे परीक्षण केले आहे.

अहिराणी भाषा ही मराठी भाषेची प्रमुख बोली मानली जाते. डॉ. पगारे हे




अनुक्रमणिका

अहिराणी ही स्वतंत्र भाषा असल्याचे प्रतिपादन करतात. ग्रिअर्सन, राजवाडे, भा.रं. कुळकर्णी, दा.गो. बोरसे यांचे विविध संदर्भातील विवेचन लक्षात घेऊन ते सांगतात की, अहिराणी ही अहिरांची भाषा आहे. ती आर्योद्‌भव आहे. अपभ्रंश भाषा ही नवभारतीय आर्यभाषांची जननी असल्यामुळे ती कोणत्याही भाषेची पोटभाषा ठरत नाही. आपल्या 'अहिराणी भाषा आणि संस्कृती' या पुस्तकात भा.रं. कुळकर्णी अहिराणी भाषा व मराठी भाषा या भिन्न भाषा असल्याचा निष्कर्ष व्याकरणभिन्नतेच्या आधारावर काढतात. पण व्याकरणिक वैशिष्ट्यांचे पुरावे स्वतंत्र भाषा निश्चित करण्यासाठी उपयोगी पडत नाहीत हे मराठी-कोकणीवादासंदर्भात सिद्ध झाले आहे. अहिराणी व मराठी या स्वतंत्र भाषा आहेत हे सांगतानाच कुळकर्णी हे अहिराणी भाषा ही संस्कृत भाषेपेक्षा प्राचीन असल्याचाही दावा करतात. भाषेचे मूळ शोधणे हे कितीही तर्कसंगत वाटत असले तरी निर्णायक पुरावे देणे हे फार अवघड होऊन बसते. प्रमाणभाषा आणि बोली यांचे परस्परसंबंध हे सामाजिक-सांस्कृतिक-शैक्षणिक-शासकीय संदर्भात ध्यानात घ्यावे लागतात; भाषांचे व्याकरण आणि अंतर्गत संरचना ध्यानात घेऊन भागत नाही. बोलणाऱ्यांची भावनाही लक्षात घ्यावी लागते. हे सर्व लक्षात घेता अहिराणीला मराठीची बोलीच म्हणावे लागते.

डॉ. पगारे यांनी प्रस्तुत पुस्तकाच्या पहिल्या भागातील चार प्रकरणे ही आभीर समाजाचे अस्तित्व, अहिराणी बोलीभाषेचा उद्‌गम आणि विकास, अहिराणी बोली, अहिराणी लोकांचे लोकसाहित्य या विषयांसाठी देऊन एक पार्श्वभूमी तयार केली आहे. पाचव्या प्रकरणात अहिराणी भाषेतील ९१७ म्हणींची अकारविल्हे यादी दिली आहे. त्यांनी म्हणींचे वर्गीकरण टोमणा मारणाऱ्या, कौटुंबिक विषयावरील, ग्राम्यता परिहार झालेल्या, तत्त्वचिंतनात्मक, सामाजिक चिंतनविषयक आणि विविध विषयांवरील म्हणी असे केले आहे. कुटुंब, ग्राम्यता परिहार, आणि सामाजिक चिंतनविषयक म्हणींचे वर्गीकरण हे समाजभाषाविज्ञानाला धरून आहे. तत्त्वचिंतनात्मक म्हणी हे वर्गीकरण समाजनिरपेक्ष म्हणता येते. परिणामतः हे वर्गीकरण समाजभाषाविज्ञानाच्या दृष्टीने विचारात घेतले तरी ते निव्वळ अहिराणी भाषेच्या संदर्भात विचार करणारे ठरत नाही.

अहिराणी म्हणींचा सामाजिक भाषाविज्ञानपद्धतीने सामाजिक भाषाव्यवहार कसा होतो हे प्रस्तुत अभ्यासाचे प्रमेय आहे असे मानले तर सामाजिक भाषाव्यवहाराची वैशिष्ट्ये शोधून काढायला हवीत. यासाठी 'म्हण'नामक पाठ्याचे विश्लेषण करायला हवे. पण असे विश्लेषण हे भाषेच्या संरचनेचे विश्लेषण होऊन आपोआपच वर्णनात्मक होते. प्रस्तुत अभ्यासात बव्हंश ते तसेच झालेले आहे. यमकान्वय, लयबद्धता, अंशाभ्यस्तता ही चर्चा संरचनात्मक - वर्णनात्मक भाषाविज्ञानाला धरून आहे. अर्थात

ही चर्चाही फारच त्रुटित केलेली आहे. काही गफलतीही झालेल्या आहेत. यमकान्वयाची चर्चा करताना 'सुजे-साजे-निजे' यांच्यामध्ये 'जे' या व्यंजनाने यमक साधलेला आहे असे म्हटलेले आहे. (पृ. ९३) सुजे-साजे-निजे या पदांत अनुप्रास साधला गेला आहे असे म्हणता येईल. प्रत्येक म्हण ही गद्य वाङ्मयकृती असते. त्यामुळे म्हणीत यमक, अनुप्रास, अतिशयोक्ती, उपमा इत्यादी अलंकार आढळतात. तिची रचना लयबद्ध असते. म्हणीच्या भाषावैज्ञानिक संरचनात्मक-वर्णनात्मक विश्लेषणातून हे सर्व विशेष हाती लागतात.

समाजभाषावैज्ञानिक विश्लेषणातून रूढी, परंपरा, विधी, संकेत, आचार-विचार, भूगोल, मिथके इत्यादींचे सामाजिक भाषाव्यवहारातून दर्शन घडायला हवे. डॉ. पगारे यांनी अवलंबलेली विश्लेषण पद्धत म्हणजे प्रथम म्हण घ्यायची नंतर तिचा वाच्यार्थ द्यायचा आणि तिसऱ्या टप्प्यात तिच्यातील 'समाजभाषा' विश्लेषून दाखवायची. त्यांनी काही ठिकाणी संरचनात्मक-वर्णनात्मक आणि समाजव्यवहारात्मक विश्लेषण अशी त्रिदल विश्लेषणपद्धत उपयोजिलेली असली आणि काही ठिकाणी सामाजिक भाषाव्यवहारातील संदर्भ स्पष्ट केले असले तरी 'समाजभाषा - व्यवहाराचे विशेष स्पष्ट होत नाहीत. उदाहरणार्थ : ''गधाले दिधा मान, गधा करे उच्चा कान'' या म्हणीचे विश्लेषण करताना वाच्यार्थ दिला आहे : ''गाढवाला मानसन्मान दिल्यावर तो उंच कान करतो''; आणि समाजभाषा म्हणून अर्थ दिला आहे : ''समाजात अडाणी, गावंढळ माणसे बरीच असतात. त्यांना मानाने, सन्मानाने बोलावले की ती गर्विष्ठ बनतात. आपण खरोखरीच खूप मोठे आहोत असे त्यांना वाटू लागते, आणि तशाच तोऱ्याने ही माणसे बोलू लागतात. 'गधा करे उच्चा कान' या वाक्प्रचाराचा अर्थ गाढवाने कान उंच करणे असा होत नसून पदवीला (मान सन्मानाला) लायक नसल्यावर शेफारून जाणे अशा समाजवैज्ञानिकदृष्ट्या अर्थच्छटा त्यामधून येतात.'' लेखकाचे हे स्पष्टीकरण पाहिले असता ते लेखकाने केलेले लक्ष्यार्थाचे स्पष्टीकरण आहे. समाजभाषावैज्ञानिकदृष्ट्या अर्थच्छटा म्हणजे लक्ष्यार्थ मानणे चुकीचे ठरेल. 'म्हननाराने म्हन केली, जानना‍राले आक्कल आली' असे बहिणाबाई चौधरी यांनी म्हटले आहे. सूक्ष्म निरीक्षण, चिंतन, मनन यामुळे म्हणीला भाषिक व सामाजिक परिमाणे प्राप्त होतात. ती परिमाणे अर्थातच भाषिक विश्लेषणाने उकलतात. बोलीभाषेत गधडा, गधा, फुरगधडा अशी मुक्त चलपदे वापरली जातात. निवड या शैलीगत निकषानुसार गधा हे पद वापरणे हे बोलीभाषेचे वैशिष्ट्य ठरते. हे पद हिंदी भाषेतले असण्याशी त्याचा संबंध जोडणे योग्य नाही. काही अहिराणी भाषिक भागांत वरील म्हणीत 'गधडा' हा पाठ वापरला जातो. 'गध्याला मान देणे' या वाक्प्रयोगात

विरोधविन्यासामुळे 'गधा-मान' असंभवनीयतेच्या पार्श्वभूमीवर स्वचित संभवनीयतेची चूक सूचित केली आहे. ती घडलीच तर परिणाम गध्याचे कान उच्चे करण्यात दृग्गोचित होतो. अहिराणीतील 'उच्चा' हे पद बोलीभाषेतून संक्रमित होणाऱ्या अर्थाचे नेटकेपणाचे पोषण करते. मान देणे आणि कान उच्चे करणे या विरोधविन्यासी कृतींमुळे विपरीत कृतीचा अयोग्य परिणाम लक्षात येतो. गधा-मान या विरोधविन्यासामुळे उपहास होऊन म्हणीतून उपरोध प्रकट होतो. माणसाच्या संदर्भात जर मानाचे काही घडले व त्याने फुशारकीने आपण एकमेवच कसे पात्र होतो हे हुरळून जाऊन प्रकट करणे हे गध्याच्या दृक्प्रतिमेमुळे कळते. इतकेच नव्हे तर, गध्याच्या पारंपरिक अर्थावर कान उच्चे करण्याची दृक्प्रतिमा आरोपित केल्यामुळे अधिक तीव्रतेने कळते. समाजभाषाविश्लेषणाचे तांत्रिक प्रतिमान सिद्ध झालेले नसल्यामुळे लक्ष्यार्थाचे स्पष्टीकरण एवढीच मजल गाठली जाते.

एखाद्या भाषेतल्या मूळ म्हणी कोणत्या व अन्य भाषांतून भाषांतरित होऊन आलेल्या कोणत्या यांची पारख करणे फार महत्त्वाचे असते. समाज-भाषावैज्ञानिक अभ्यासाने हे शक्य होते. संबंधित भाषेतील शब्द, रचना; तसेच त्या समाजातील संकेत, मिथके, आकलनाच्या मुशी इत्यादींद्वारा मूळ म्हणी शोधता येतात. उदाहरणार्थ : 'खाटकीले शेळी धाराजिनी'; 'चांभारना देवाले खेटरनी पूजा'; 'कुत्रानं शेपूट नयीमा घालं, कितलंभी कये तरी ते वाकडंच !'; 'कामपुरता मामा, ताकपुरती आजीबाई'; 'श्रीमंतीले लाज नही गरीबीले इलाज नही' इत्यादी. या म्हणींतील अधोरेखित पदे अहिराणीत वापरली जात नाहीत. त्यांची बोलीभाषिक मुक्त चलपदे 'बरुरी', 'चमारना', 'कुतरानं', 'आजलीबाई', 'सिरीमंतीले' अशी आहेत. पण मुद्दा मुक्त चलपदांचा असला तरी ह्या म्हणींतून अहिराणीभाषक समाजाचे व्यवच्छेदकत्व स्पष्ट होत नाही. या म्हणी भाषांतरीत आहेत. 'काम नही काय करू नवं लुमडं दांडे करू', 'कुमारना पोऱ्याले बाडगिना नितात', 'जवाईनी जात कांदानी पात', 'दळे तिले कळे, फुकटी गोंडा घोळे', 'येडीनं मत नि घुबड ना चाया', 'आठीदिन पुऱ्या आनि सनले घुगऱ्या', 'उभंड रांड कभांड करे, दुबऱ्या दादचावर संताप करे', 'गाजरभर आथा ते मुळाभर तथा', 'ज्याना घर गाय त्यांना घर इठ्ठलना पाय', 'स्थानाना बैल बांदवर चरतस', 'घर ल्हानं, मानूस कुह्यनं' या म्हणी मात्र मूळ अहिराणी वाटतात. अशा अनेक म्हणी या पुस्तकात आहेत. या म्हणींच्या विश्लेषणाने भाषिक तसेच सामाजिक वैशिष्ट्ये सापडू शकतात. माणसाच्या संदर्भात अनेक तत्त्वे सार्वजनिक असल्यामुळे म्हणींचे आदान-प्रदान सहज होते; पण आदान झालेली म्हण त्या भाषेचे रूप धारण करते. म्हण उद्धृत करताना त्या रूपांची काळजी घेतली पाहिजे, हे वरील प्रमाण मराठीतील अधोरेखित रूपे व अहिराणी बोलीतील





अनुक्रमणिका

त्यांचीच मुक्त चलरूपे यावरून ध्यानात येते. आणखी काही उदाहरणे पाहता येतील. बाजार-बजार; विठ्ठलना-इठ्ठलना; विठोबा-इठोबा; विस-ईस; श्राद्ध-सराद; प्रकार-परकार इत्यादी. अहिराणीत 'ळ' चा 'य' होण्याची प्रवृत्ती आहे, खानदेशात तर आहेच; तिचा आविष्कार कुठे दिसतो तर कुठे नाही. 'वि' चा 'इ' होण्याची प्रवृत्ती आहे वीस > इस, विठ्ठल > इठ्ठल वगैरे. या प्रवृत्ती ध्यानात घेऊन तसेच लेखन व्हावे; म्हणजे अनियमितता टळते. अहिराणी भाषेतच परिसरानुसार काही भेद आढळून येतात. म्हणींमध्ये त्यामुळे अनेक पाठभेद आढळतात, त्या पाठभेदांचा विचार केला तर अस्सल अहिराणी भाषेतील म्हणींची निश्चिती करता येऊ शकते. समाजभाषाविज्ञानातील भेद या महत्त्वपूर्ण तत्त्वाला ते धरून होते. समाजभाषाविज्ञान ही संस्कृतीविज्ञान व मानववंशविज्ञान यांना व्यापणारी अभ्यासशाखा आहे. त्यामुळे भाषेचा सामाजिक वापर या विविध संदर्भात घेणे आवश्यक ठरते.

डॉ. पगारे यांनी सुरुवात चांगली केली आहे. विशिष्ट दृष्टी ठेवून नेटका अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. समाजभाषावैज्ञानिक पद्धतीची नेमकी प्रतिमाने नसल्यामुळे या अभ्यासाला मर्यादा पडल्या आहेत. अभ्यासपद्धतीच्या मर्यादा कधी ना कधी नाहीशा करणे हे अभ्यासकांचे कर्तव्य आहे. त्या दिशेने विचार करण्याची संधी डॉ. पगारे यांनी दिली आहे व त्या हेतूनेच प्रस्तुत पुस्तकाचे परीक्षण केले आहे. ■

**'कल्पलता', पीडीपी नगर सटाणा : ४२३३०१ जि. नाशिक**

## बाया पक्ष्याला सुगरण का म्हणतात ?

हा प्रश्न मला अनेक दिवस होता. परवा 'गाथासप्तशती' या प्राचीन काव्यसंग्रहाचे वाचन करताना एक निराळी उपपत्ती सुचली. गाथासप्तशतीची भाषा सातवाहन काळातली दोन हजार वर्षांपूर्वीची. रोजच्या वापरातील अनेक शब्द या संग्रहात आहेत. 'घरिणी' हा शब्द असाच. त्याचे 'गृहिणी' हे संस्कृत रूप मराठीमध्ये स्वीकारले. त्यामुळे 'सुगरण' शब्दाचा 'सुघरिणी'शी मूळचा थेट संबंध असावा. तशात 'सुगृहिणी' ही पाककुशल हवीच या गृहीत कल्पनेमुळे, तिच्या 'सुगरीण' या अपभ्रंशित रूपाला फक्त 'पाककुशल' असा वाच्यार्थच चिकटून राहिला असावा. आणि सुंदर घर असलेली (किंवा बांधणारी) ती सुघरिणी हा सोपा अर्थ आपण विसरून गेलो. घर बांधण्याच्या अद्‌भुत कौशल्यामुळे एकाहून अधिक 'बाया'(बायका) मिळविणारा हा 'बाया' पक्षी आणि त्यांचे अर्धेमुर्धे बांधलेले घर पसंत पडल्यास त्याला नवरा म्हणून पसंत करणारी आणि ते घर पूर्ण बांधायला स्वतः हातभार लावणारी त्याची मादी यांना 'सुघरण-सुघरीण' म्हणायचे नाही तर कोणाला ? जैन आगमसाहित्यातील बृहत्कथाभाष्यात बाया पक्ष्याचा उल्लेख 'सुगेह' असाचा केला आहे.

**अरुंधती वर्तक,** पुणे, दै. सकाळ, ३०-४-०५







# संदर्भसंपन्न, विवेचक आणि उपयुक्त

विजया देव

[परीक्षित पुस्तके : 'भाषणरंग : व्यासपीठ आणि रंगपीठ', १९९५, पृष्ठे २७८, रु. १६०/-. 'भाषण व नाट्यविषयक विचार', २००१, पृष्ठे १७१, रु. १६०/-, अशोक दा. रानडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ]

विज्ञान-तंत्रज्ञानाच्या क्षेत्राचा सध्या झपाट्याने विकास होत आहे, विविध प्रकारच्या प्रसारमाध्यमांनी आपल्यावर पुरता पगडा बसवला आहे. भौगोलिक मर्यादा उल्लंघून माणसे एकमेकांशी संवाद साधू शकतात. याचे प्रत्यंतर आपल्याला चित्रवाणी, संगणक, दूरध्वनी, भ्रमणध्वनी इत्यादी माध्यमांतून येते. या माध्यमांनी उपजीविकेच्या, अर्थार्जनाच्या क्षेत्रांतही बदल केले आहेत. अधिकाधिक व्यवसाय, नोकऱ्या या क्षेत्राशी निगडित आहेत. या अत्याधुनिक संपर्क-यंत्रणेत काम करणाऱ्याचे मुख्य भांडवल त्याची भाषा - विशेषतः आवाज व भाषण - हे झालेले आहे. वाणी आणि भाषा यांवर ज्याचे प्रभुत्व त्याची सरशी हा या युगाचा मंत्र आहे; तीच मानवी संपत्ती बनली आहे.

आवाजात मूलभूत सुधारणा घडवून आणणे, आपली भाषणक्रिया नियंत्रित करणे, आवाज व भाषण या दोन्ही अंगांचा विकास साधणे यांचा भरपूर तात्त्विक ऊहापोह करणारी व निश्चित दिशा देणारी ही दोन पुस्तके आहेत.

''भाषणरंग..''च्या 'आवाज लावण्यापूर्वी...' या छोटेखानी प्रास्ताविकात रानडे म्हणतात, ''प्रस्तुत पुस्तक भाषणविषयक आहे. प्राध्यापक, पुढारी, वकील, वक्ते वगैरेंपासून अभिनेत्यांपर्यंत सर्वांना उपयोगी पडणारे. काळजीपूर्वक अभ्यास आणि कसोशीने सराव केल्यास निश्चित आणि गुणवत्तात्मक बदल घडवून 'बोलणे' सुफल, संपूर्ण होईल अशी ग्वाही देणारे.'' खरं म्हणजे आजच्या काळात प्रभावी भाषणाची गरज सर्व स्तरांतल्या लोकांना आहे; रानडे म्हणतात तसे फक्त प्राध्यापक, पुढारी.. इत्यादी मोजक्या व्यावसायिकांना नव्हे. म्हणूनच, बदललेल्या काळात या पुस्तकाचे महत्त्व अपरंपार वाढलेले आहे.

दोन्ही पुस्तकांच्या शीर्षकांत असलेल्या 'भाषण' या संज्ञेचा अर्थ इथे समजून घेतला पाहिजे. कारण व्यवहारात प्रचलित असलेल्या अर्थापेक्षा इथे तिला निराळा अर्थ आहे. लेखकाने या संज्ञेची व्याख्या अशी केली आहे : ''उच्चारित शब्दाद्वारा विचार वा भावना व्यक्त करण्याची क्रिया म्हणजे भाषण. ज्या उच्चारित ध्वनींचे उच्चारण निरनिराळे (म्हणजे सुटेपणे) करता येणे शक्य आहे त्या ध्वनींच्या अर्थपूर्ण जुळण्या निर्माण करणे म्हणजे भाषण. आवाज आणि भाषा यांच्या एकत्रित आणि नियंत्रित वापरातून भाषण सिद्ध होते.'' (भाषणरंग, पृ. २) 'रंग' या संज्ञेबद्दल लेखक म्हणतात की, ''या संज्ञेचे बहुतेक अर्थ संगीत-नृत्य-नाट्याशी संबंधित आहेत. वर्ण या अर्थाशी संबंधित तुलनेने पाहता कमी.'' (भाषण व नाट्यविषयक विचार, पृ. १३७) अशा रीतीने व्यासपीठ व रंगपीठ यांवरील 'भाषणा'चा सर्वांगीण विचार करण्याची 'भाषणरंग' या पुस्तकाची भूमिका आहे.

या पुस्तकात तीस प्रकरणे असून सरावासाठी भरपूर स्वाध्याय देण्यात आलेले आहेत. पहिली चार प्रकरणे आवाजाचे तात्त्विक विवेचन आणि अभ्यास यांना वाहिलेली आहेत. 'मनुष्य किंवा प्राणी यांच्या कंठातील यंत्रणेतून निर्माण होऊ शकणारा विशिष्ट ध्वनी म्हणजे आवाज होय.' (पृ. १) ध्वनिनिर्मिती आणि उच्चारणप्रक्रिया ज्यामुळे शक्य होते ती शरीरावयवरचना व क्रिया यांचा परिचय पुढील प्रकरणांमधून होतो. भाषणातील नैसर्गिक 'तारता', लय, भाषेचे स्तर, भाषण-गुण यांचा तात्त्विक आणि साधार ऊहापोह अगदी प्राथमिक अशा भाषणकर्त्याला समोर ठेवून लेखकाने केला आहे.

लेखकाने परंपरागत पद्धतीने हिंदुस्थानी शास्त्रोक्त गायनाचे वीस-एक वर्षे शिक्षण घेतल्यानंतर आवाज जोपासनेचा अभ्यास करून त्यात स्वत:ची वाट सिद्ध केली. या व्यासंगाच्या आधारावर गायन व भाषण या दोहोंसाठी स्वतंत्र अभ्यासक्रम आखून अनेक वर्षे ते यशस्वीपणे राबविले. त्या संबंधातील कार्यसत्रे, स्वाध्याय, तालमी या सर्वांचा परिपाक म्हणजे हे पुस्तक आहे. यातील तीस प्रकरणे म्हणजे तीस स्वाध्याय होत. विषयाचा सखोल व्यासंग, शास्त्रशुद्ध सैद्धांतिक विवेचन, विद्यार्थ्यांत सुधारणा घडवून आणण्याची कळकळ या गोष्टी पुस्तकाच्या भाषेत थेट प्रतिबिंबित झाल्या आहेत.

दुसरे पुस्तक 'भाषण व नाट्यविषयक विचार' हे वेगळ्या भूमिकेतून तयार झालेले आहे. त्यामुळे त्याची मांडणीही वेगळी आहे. शीर्षकाशी प्रामाणिक असा वैचारिक गाभा हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य. या विवेचनात ते उदाहरणे, प्रात्यक्षिके देत नाहीत. 'भाषणरंग...' मधील वैचारिक व तात्त्विक भूमिकाच ते या पुस्तकात मांडतात, पण या मांडणीचे प्रयोजन वेगळे आहे.








या पुस्तकातील काही लेख पूर्वप्रकाशित आहेत, तर काही नव्याने लिहिलेले आहेत. राष्ट्रीय संगीतनाट्य केंद्राचे उपसंचालक या नात्याने 'रंगभूमी विकास अंमलबजावणी प्रकल्पा'ची आखणी करत असताना झालेल्या विचार-मंथनाचे फलित म्हणजे हे पुस्तक आहे. हौशी व व्यावसायिक रंगभूमी आणि चित्रवाणी या माध्यमांशी जुळवून घेत धडपडणाऱ्या गुणवंतांना नाट्यशिक्षणाचा गंभीर विचार देणे ही त्यामागची निकड. याही पुस्तकात आवाज, भाषण व नाट्यविषयक बाबींचा विचार आहेच. मात्र थोडा प्रगल्भ अभ्यासक नजरेपुढे ठेवून या पुस्तकाची मांडणी करण्यात आली आहे. अनुभवी मार्गदर्शक असल्याशिवाय यातील संदर्भ नवोदित उमेदवारांना समजून घेता येणार नाहीत. या पुस्तकातील लेखनाचे स्वरूप छोटे छोटे, स्वयंपूर्ण, स्वतंत्र लेख अशा स्वरूपाचे आहे. ते सर्व मिळून एक विचार सिद्ध होतो. सर्वांत जमेची बाजू अशी की, ''तत्त्वकल्पनांची वाटचाल ज्या गुंतागुंतीच्या वळणांनी होते'' ती रेखण्याइतकी समर्थ आणि संवेदनशील भाषा लेखकाजवळ आहे. उदाहरणार्थ, 'नाट्यात्म भाषणातील आवाज-जोपासना' या प्रकरणात रानडे म्हणतात, ''आवाजांचे परिणाम जाणीवपूर्वक, दक्षपणे बांधत जावे लागतात... आवाजाची सर्व परिमाणे ग्रहण करणारे कान व निर्माण करणारे कंठ हवेत. कोणत्याही सामूहिक प्रयत्नांत कलेइतकीच कारागिरी लागते. स्फूर्तीच्या क्षणैक झटक्यांपेक्षा सहेतुक व दीर्घकालीन साधनेची नाट्याविष्कारात गरज असते. नाहीपेक्षा संवादशिल्प उभे न राहता, त्यांची मालिका कानी पडते. सुट्या भाषणांचे शिल्प बनते ते स्वनरचनेच्या व्यापक वास्तुशिल्पीय तत्त्वामुळे. पात्रे म्हणजे आवाजांचे उगम नाहीत, तर फुलत राहणाऱ्या नाट्यात्म तणावांची ती केंद्रे आहेत. आवाजाची फेक करण्यात व्यक्तिगत छाप दिसते, तशीच शैली - आणि शैली एक सामाजिक निर्मिती असते.'' (पृ. ५३-५४).

अभ्यासक आणि सादरीकरणाच्या क्षेत्रात काम करू इच्छिणारा यांच्या दृष्टीने या पुस्तकांचे मोल निर्विवाद आहे. हे लेखन वाचल्यावर असे जाणवते की लेखकाने आपल्याला (= वाचकांना) माहीत असलेल्या काही गोष्टी नव्याने अधोरेखित केल्या आहेत, दीर्घ आणि समृद्ध भारतीय नाट्यपरंपरेच्या संदर्भात आजच्या काळातील घटितांचे विश्लेषण केले आहे आणि विषयाशी संबंधित पाश्चात्य संदर्भ अर्थपूर्ण रीतीने दिले आहेत. सर्व विवेचनाला शास्त्रीय अभ्यासाची पक्की बैठक आहे. उदाहरण म्हणून ही काही प्रकरणे पहा - 'प्रकाशयोजना : सांस्कृतिक चौकटीतून' (प्रकाशयोजना ही रंगभूमीचा एक सुटा घटक नसून रंगभूमीविषयक जाणिवेचा आविष्कार आहे, या दृष्टीने लेखकाने हा विषय मांडला आहे.) 'संज्ञापन आणि निर्भाषिक', 'हावभावांची परिमाणे', 'भाषणातील लय'. कोणताही विषय मांडताना त्याच्याशी निगडित

असलेल्या संज्ञा, संकल्पना स्पष्ट करणे, त्यांच्या व्याख्या देणे, त्यांचा इतिहास सांगणे आणि मग विषयविस्तार करणे ही शिस्त लेखकाने सर्वच लेखनात पाळली आहे. उदाहरणार्थ नुसत्या हावभावांबद्दल बोलताना लेखकाने हालचाल व हावभाव यांतील फरक, त्यांच्या व्याख्या, या दोन्हींच्या जवळ असणाऱ्या डौल, ढब, मोहरा इत्यादी शरीरस्थिती यांचाही विचार केला आहे.

संदर्भसंपन्न, विचारसंपन्न, विवेचक आणि रंगभूमी व चित्रवाणी या क्षेत्रांतील तरुण पिढीला अत्यंत उपयुक्त असणाऱ्या या पुस्तकांचा अनुवाद सर्व भारतीयांसाठी, इंग्रजीसह अन्य भारतीय भाषांत होणे आवश्यक आहे. ■

**सुप्रिया, ६१/१४, एरंडवणे, प्रभात रस्ता, गल्ली क्र. १४, पुणे ४११००४**
**दूरध्वनी क्र. २५४३८८१५**

## माझे भाषाशुद्धीचे प्रयोग

रात्री मुलगा, त्याने आजोबांना लिहिलेले पत्र घेऊन आला. मी त्याची भाषिक करामत वाचत असताना त्याने म्हटले, ''बाबा आजोबांचा पत्ता सांगा.''

''लिही. वृंदावन कॉलनी, गंगापूर रोड, एस.टी.कॉलनीजवळ, पिनकोड नंबर.''

''हे काय बाबा ? वृंदावन आणि गंगापूर सोडून सारेच शब्द इंग्रजी.''

मी मदतीसाठी आजोबांच्या पत्त्यावर आलेला म.सा.प.चा अंक घेतला आणि त्यावरचा पत्ता लिहिताना लिहिणाराने सरळ एस.टी.कॉलनी जवळ, पिनकोड नंबर असे लिहिले होते. (पिन कोडला मराठी प्रतिशब्द कोणता हा माझ्यापुढील मोठा प्रश्न.)

मार्गदर्शनासाठी मी 'भाषा आणि जीवन'च्या अंकात लेखकांनी स्वत:चे म्हणून दिलेले पत्ते बघू लागलो. पण हा हन्त ! हन्त ! लेखकांचे पत्ते... अपार्टमेन्ट, टेलिफोन, कॉलनी, बस स्थानकामागे, पिनकोड नंबर...

बस आणि स्थानक या फ्युजन प्रकाराने माझे कन्फ्युजन वाढले. मी अंक मिटून खाली ठेवला, त्या वेळी माझे लक्ष मलपृष्ठावरील ठळक अक्षरांकडे गेले. 'मराठी वाचा मराठी वाचवा'; पण त्या वेळी त्यावर लिहिलेले बुक-पोस्ट, बुक-पॅकेट हे शब्द माझ्या डोळ्यात कुसळासारखे सलू लागले.

मराठी वाचण्याचा आणि वाचविण्याचा माझा प्रयत्न आता एक निर्णायक टप्प्यावर येऊन पोहोचला होता...

**उदय शुक्ल,** दै. गावकरी, ५-१०-०३








# शालान्त परीक्षेतील मराठीचा निकाल

सुप्रिया सहस्त्रबुद्धे

१९ डिसेंबर २००४ रोजी मराठी अभ्यास परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने ''शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय'' या विषयावर एक चर्चासत्र आयोजण्यात आले होते. चर्चेच्या पहिल्या सत्रात श्री. श्री. वा. कुलकर्णी व श्री. वा. भा. जोशी यांनी निबंध-वाचन केले. या सत्राच्या अध्यक्षस्थानी डॉ. अशोक केळकर होते. प्रारंभी कार्यवाह, डॉ. नीलिमा गुंडी यांनी चर्चासत्रामागची भूमिका स्पष्ट केली. त्या म्हणाल्या, की ''दहावी शालान्त परीक्षेच्या निकालात 'मराठी' विषयात महाराष्ट्रातील एकूण चौदा लाख विद्यार्थ्यांपैकी दोन लाख विद्यार्थी अनुत्तीर्ण झाले आहे. २७ जूनच्या परिषदेच्या सर्वसाधारण सभेत हा विषय चर्चेला आला. विद्यार्थी अनुत्तीर्ण होण्यामागच्या कारणांचा शोध घेऊन त्यावर तात्कालिक व दीर्घकालीन उपाययोजना करता यावी म्हणून या चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले आहे.''

श्री. श्री.वा. कुलकर्णी यांनी प्रथम आपल्या निबंधाचे वाचन केले. निकालाचे स्वरूप व मर्यादा स्पष्ट करताना त्यांनी २७ जून २००४ रोजी 'दै. सकाळ'मध्ये आलेल्या 'दोन लाख पंधरा हजार विद्यार्थी नापास' या बातमीकडे लक्ष वेधले गेल्याचे सांगून मागील तीन वर्षांतील निकालांची आकडेवारी सांगितली. तसेच राज्यातील एकूण निकालाच्या विभागवार निकालांची आकडेवारी त्यांनी सांगितली. त्याचप्रमाणे इतर विषयांच्या तुलनेत मराठीच्या निकालाचीही सरासरी त्यांनी सांगितली. उपायोजना सुचवताना त्यांनी त्यांचे तात्कालिक व दीर्घकालीन असे दोन विभाग केले. त्यांच्या मते कमी निकाल लागणाऱ्या शाळांसाठी विशेष अभ्यासवर्गांचे आयोजन करणे, मराठी या विषयाकडे एक विषय म्हणून न पाहता 'माध्यमाची भाषा' म्हणून पाहणे आणि अभ्यासक्षेत्राचा समतोल राहण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे गरजेचं आहे. मराठी हा केवळ एक भाषाविषय नसून ती आपली 'माध्यम भाषा' आहे. आपण गणित, विज्ञान इ. विषय मराठीतूनच शिकवतो म्हणून ती माध्यम-भाषा आहे. प्रश्नपत्रिका-विश्लेषण, पाठ्यपुस्तक-विश्लेषण, मॉडरेटरचा दृष्टिकोण याविषयीही त्यांनी विवेचन केले.

विद्यार्थ्यांची भाषिक कौशल्ये वाढण्यासाठी संभाषण, लेखन, वाचन यांचा सजगपणे पाठपुरावा करून त्यात सलगता, सातत्य आणून त्याविषयी विद्यार्थ्यांमध्ये जाणीवजागृती केली पाहिजे. हस्ताक्षर, लेखनाचा वेग, व्याकरण इ.साठी पाचवी ते आठवी या इयत्तांमध्ये विशेष प्रयत्न करायला हवेत. कथाकथन, नाट्यवाचन, भित्तिपत्रक या माध्यमातून रंजक पद्धतीने विषय समजावून देऊन, विद्यार्थ्यांची त्यातली गोवणूक वाढवण्यासाठी प्रयत्न करायला हवेत. शुद्ध उच्चार, बिनचूक बोलण्याची संधी विद्यार्थ्यांना दिली पाहिजे. याशिवाय पालक-प्रबोधनाची आवश्यकताही त्यांनी सांगितली.

श्री. कुलकर्णी यांच्यानंतर श्री. वा.भा. जोशी यांनी आपला निबंध सादर केला. (तो या अंकात समाविष्ट केला आहे.)

दोन्ही निबंधांच्या वाचनानंतर खुली चर्चा झाली. त्यामध्ये आशा मुंडले, डॉ. नीलिमा गुंडी, डॉ. मेधा सिधये, डॉ. मॅक्सीन बर्नसन, कल्याणी दिवेकर, अनिल गोरे, स.म. परळीकर, प्रा. राईलकर, डॉ. श्यामला वनारसे, स्वामिनी रुद्रभटे, प्र.ना. परांजपे, अपर्णा जोशी, श्री. होळकर हे सहभागी झाले.

प्रा. प्र.ना. परांजपे म्हणाले की, ''भाषा हा निव्वळ शाळेत शिकवण्याचा विषय नाही. तो आजूबाजूचा परिसर, घर, निसर्ग, नभोवाणी, चित्रवाणी, समाजाला आपल्या कवेत घेणारा विषय आहे. तेव्हा त्याकडे व्यापक दृष्टिकोणातून पाहायला हवे. आवांतर वाचन, चर्चा, हस्ताक्षर स्पर्धा इत्यादी उपक्रमांतून भाषेबद्दल जागरूकता वाढत जाते. केवळ आक्रस्ताळेपणा करण्यापेक्षा काहीतरी सकारात्मक करायला हवे.''

डॉ. अशोक केळकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. ते म्हणाले की, ''मराठीची ही अवस्था काही आजची आहे असे नव्हे. पूर्वीही अशीच परिस्थिती होती. विद्यार्थी हा कुणी दुबळा प्राणी आहे असे समजूनच आजपर्यंत आपण शिकवित आलो. म्हणजेच दडपण्याची प्रवृत्ती आपण जोपासत आलो. खपवून घेणं किंवा पड खाणं हा आपला स्वभावच झाला आहे. हे सर्व बदललं पाहिजे.''

दुपारी २ ते ५ या वेळेतील चर्चेच्या दुसऱ्या सत्रात श्रीमती स्वामिनी रुद्रभटे आणि श्रीमती शुभदा चौकर यांनी आपले निबंध सादर केले. या सत्राच्या अध्यक्षस्थानी ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ प्रा. लीलाताई पाटील होत्या.

'लोकसत्ता'च्या सहसंपादक श्रीमती शुभदा चौकर यांनी प्रथम आपले विचार मांडले. मराठी विषयाची सद्य:स्थिती व एकूणच आपली शिक्षण-व्यवस्था यासंबंधी त्यांनी स्वत:च्या अनुभवातून आलेले काही मुद्दे मांडले. त्या म्हणाल्या की, ''मराठी पुस्तकांची पुनर्रचना करणे गरजेचे आहे. पुस्तकांत चित्रे, रेखाटने विद्यार्थ्याला वाचावेसे वाटेल अशी मांडणी असावी, आकर्षकता असावी. वाचनसंस्कृती वाढवण्याच्या दृष्टीने

फारसे प्रयत्न होताना दिसत नाहीत. असे प्रयत्न शाळांच्या माध्यमातून व्हायला हवेत; परंतु ते होत नाहीत. याकडे शिक्षक आणि शाळांनी काटेकोरपणे लक्ष द्यायला हवे.'' 'पहिली पासून इंग्रजी' या निर्णयाचे त्यांनी स्वागत केले. तसेच आपणाला मराठी शाळांचे 'मार्केटिंग' करता यायला हवे. निरनिराळे उपक्रम राबवले जावेत. मराठी भाषेच्या उपयुक्ततेचं मार्केटिंग करावं, असं सांगून त्या पुढे म्हणाल्या की, ''शिक्षकांनी आपल्या अध्यापनातून येणाऱ्या काळाचे भान विद्यार्थ्यांना करून द्यावे. त्याचप्रमाणे अध्यापनात भाषा-निगडीत व्यवसाय असायला हवेत.''

यानंतर दुसऱ्या निबंधवाचक श्रीमती स्वामिनी रुद्रभटे यांनी आपल्या निबंधाचे वाचन केले. (त्यांचा निबंध या अंकात समाविष्ट केला आहे.)

या दोन्ही निबंधांच्या वाचनानंतर खुली चर्चा झाली. त्यात राजकुँवर सोनवणे, डॉ. मॅक्सीन बर्नसन, डॉ. गं. ना. जोगळेकर इ. अनेक तज्ज्ञ सहभागी झाले. सोनवणे यांनी विद्यार्थ्यांत मराठी विषयाच्या संदर्भात न्यूनगंडाची भावना असल्याचे सांगितले. हा न्यूनगंड दूर करायचा असेल तर शुद्धलेखनाकरिता दररोज पाच शब्द लिहून ठेवणे, शब्दांच्या, कवितेच्या भेंड्यांच्या खेळ घेणे, इत्यादी स्पर्धात्मक उपक्रम नियमितपणे आयोजित करणे आवश्यक असल्याचे सांगितले. डॉ. मॅक्सीन बर्नसन यांनी मराठीचे पाठ्यपुस्तक कसे असावे, अभ्यासक्रम कसा असावा यासंबंधी चर्चा होणे अत्यंत गरजेचे असल्याचे स्पष्ट केले. अलंकार, वृत्त हे थोडे-थोडे शिकावेत का ? याचाही विचार होणे आवश्यक आहे. तर डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी सध्याच्या बदलत्या सामाजिक परिस्थितीचा विचार करणे अगत्याचे असल्याचे सांगितले. सध्याची शिक्षणव्यवस्था परीक्षाकेंद्री झाल्यामुळे विद्यार्थ्याला बदलत्या सामाजिक परिस्थितीची जाणीवच होत नाही. खरी सौंदर्य दृष्टी म्हणजे काय ? स्वत:च्या कर्तव्याची जाण असणे म्हणजे काय ? एखाद्या गोष्टीचा विचार कशा प्रकारे करावा ? हे आजच्या विद्यार्थ्याला समजावून सांगण्यात आजची शिक्षणपद्धती कमी पडली आहे. शिक्षणखात्यातील राजकीय हस्तक्षेपामुळे आजचं शिक्षणखातं मुर्दाड झालं आहे. विद्यार्थ्यांची, उद्याच्या नागरिकाची चिंता ना सरकारला, ना शिक्षकाला व शिक्षणखात्याला राहिली आहे. गांभीर्याने हे प्रश्न सोडवावेत असे कोणाला वाटत नाही.'' असं ते म्हणाले.

या चर्चेनंतर ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ व या सत्राच्या अध्यक्ष प्रा. लीलाताई पाटील यांनी आपले विचार मांडले. अत्यंत ओघवत्या शैलीत त्यांनी महत्त्वाच्या मुद्द्यांना स्पर्श केला. ''पाठ्यपुस्तक मंडळात राजकीय हस्तक्षेप वाढला असून पुस्तकांचे 'सरकारीकरण' झाले आहे. प्रश्नाला भिडण्याची आपली तयारी नसल्याने अशा प्रकारचे





अनुक्रमणिका

अनेकपदरी प्रश्न उभे आहेत. प्राथमिक स्तरावर मराठी उत्तमपणे शिकवलं गेलं पाहिजे. बहुतेकदा आमचं मराठी शिकवणं हे रटाळवाणं असतं. मग मुलांना त्यात गोडी कशी वाटेल ? खरं तर या प्रश्नाला एकदा आपण भिडलो म्हणजे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न सहज सुटतील. शुद्धलेखनाच्या संदर्भात फार आग्रह धरू नये. त्यासंदर्भात हळूहळू ज्ञान द्यावे. शुद्धलेखन सुद्धा आनंददायी पद्धतीने शिकवता यायला हवं.'' असं सांगताना प्रा. पाटील यांनी, मराठी अभ्यास परिषदेने यासंदर्भात पाठ्यपुस्तक मंडळाला काही ठोस परंतु मूलभूत सूचना कराव्यात असेही सुचविले. त्याबरोबर ''समाजात जे दिसतं तसं मुलं करतात. म्हणजे मुलं अनुकरणप्रिय असतात. तेव्हा मुलांचा श्वास-विश्वास, मुलांची स्वप्नं, त्यांची आवड - कल या गोष्टींकडे विशेषत्वाने पाहिलं गेलं पाहिजे. त्याकरिता लोकचळवळ झाली पाहिजे. इंग्रजी ही जशी ज्ञानभाषा आहे तशी मराठीही मर्यादित पातळीवर ज्ञानभाषाच आहे. तेव्हा त्यासंबंधीचा न्यूनगंड काढून टाकयला हवा.'' असे त्या म्हणाल्या.

यानंतर डॉ. गं.ना. जोगळेकर समारोपाच्या विवेचनात म्हणाले की, ''शिक्षणव्यवस्था काय किंवा मराठी भाषा काय, यासंबंधी प्रचंड अनास्था आहे. सगळे प्रश्न अतिशय गुंतागुंतीचे, व्यामिश्र झाले आहेत. ज्याला जसे शक्य असेल, तसे त्याने आपापल्या पातळीवर प्रामाणिकपणे प्रयत्न करणे आवश्यक आहे.''

चर्चासत्राचे सूत्र-संचालन डॉ. मृणालिनी शहा व सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी केले. शिक्षणक्षेत्राशी संबंधित मंडळी आणि सुजाण पालक या चर्चासत्रात सहभागी झाले होते.

**शिफारशी**

चर्चासत्रातील विचारमंथनाच्या आधारे मराठी अभ्यास परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या वतीने शिक्षणमंडळ पुणे यांजकडे पुढील शिफारशी पाठवण्यात आल्या :

( १ ) मराठी (प्रथम भाषा) या विषयाच्या प्रश्नपत्रिकेचे स्वरूप सुटसुटीत असावे. आठ-दहा पानी प्रश्नपत्रिका पाहून विद्यार्थ्यांवर मानसिक दडपण येते. ते दडपण दूर व्हायला हवे.

( २ ) परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेत एकाच पाठावर अनेक प्रश्न विचारणे टाळावे. परीक्षेत पाठ्यपुस्तकातील पाठांना समतोल स्थान दिले जावे.

( ३ ) मराठीची भाषिक कौशल्ये-वाचन. अनुलेखन इत्यादी विद्यार्थ्यांनी आत्मसात केली आहेत की नाहीत हे पाहण्यासाठी तोंडी परीक्षापद्धतीही स्वीकारली जावी.

( ४ ) परीक्षकांसाठी कार्यशाळा आयोजित केल्या जाव्यात. त्या वेळी परीक्षकांना नमुना उत्तरपत्रिकेचा - त्यातील मार्गदर्शनपर सूचनांचा - तारतम्याने वापर

कसा करावा, याबाबत दिग्दर्शन केले जावे. त्यामुळे मूल्यमापनात एकसूत्रीपणा व काटेकोरपणा येणे शक्य होईल.

( ५ ) शिक्षकांसाठी सातत्याने प्रशिक्षण-शिबिरे आयोजित करून त्यांना नवनव्या शैक्षणिक पद्धतींची व साधनांची माहिती दिली जावी.

( ६ ) आपल्या संशोधन-विभागातर्फे काही प्रकल्प राबवले जावेत. त्यात शहरी, निमशहरी आणि ग्रामीण भागांतील मराठीच्या विद्यार्थ्यांच्या अध्ययनातील समस्यांची पाहणी करण्यात यावी व त्यांच्या निराकरणासाठी काही उपाययोजनांचीही चाचणी घेतली जावी.

( ७ ) मराठीच्या पाठ्यपुस्तकाबरोबर अभ्यासक्रमात समाविष्ट असलेल्या लेखन व व्याकरणविषयक भागासाठी संदर्भपुस्तिका तयार केली जावी.

( ८ ) मराठीची पाठ्यपुस्तके आकर्षक ठरण्यासाठी त्यात चित्रे, रेखाटने यांचा समावेश केला जावा. पाठ्यपुस्तकातील संकल्पना समजण्यासाठी योग्य तेथे रेखाटनांची मदत घेतली जावी.

( ९ ) मराठीच्या पाठ्यपुस्तकांमध्ये समकालीन भाषा व साहित्य यांना अधिक प्रमाणात स्थान द्यावे. पाठांची निवड केवळ साहित्यिक मूल्यांच्या निकषावर केली जावी.

पहिलीच्या पाठ्यपुस्तकापासून दहावीच्या पाठ्यपुस्तकापर्यंत जाताना आणि पाठ्यपुस्तकातील प्रारंभीच्या पाठांपासून शेवटाकडील पाठांपर्यंत जाताना शिक्षणशास्त्रास अनुसरणारा क्रम प्रत्येक पाठ्यपुस्तकात असायला हवा. तो असा : परिचिताकडून कमी परिचिताकडे (उदा० समकालीन वाङ्मयापासून पूर्वकालीन वाङ्मयाकडे). सोप्याकडून अवघडाकडे (भाषा व विषय दोन्ही प्रकारे अवघड). रंजकतेकडून विवेचनात्मकतेकडे. असा क्रम शिकवताना लक्षात ठेवण्याचे भान शिक्षकांना हस्तपुस्तिकांमधून दिले जावे.

( १० ) साहित्यमूल्य आणि सामाजिक मूल्य यांचा समतोल नसल्यामुळे मराठीची पाठ्यपुस्तके नीरस बनली आहेत. परिणामी विद्यार्थी मराठी भाषेपासून दुरावतो.

( ११ ) शिक्षकांसाठी उपलब्ध असणाऱ्या हस्तपुस्तिकांचा दर्जा सुधारण्यावर भर दिला जावा.

( १२ ) मराठीच्या विद्यार्थ्यांचा न्यूनभाव कमी होईल आणि शिक्षकांच्या आत्म-विश्वासाला, तसेच त्यांच्या उपक्रमशीलतेला वाव मिळेल; असे निकोप शैक्षणिक वातावरण निर्माण करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले जावेत. ■

[वरील उपाययोजनांची नोंद घेतल्याचे शिक्षणमंडळाच्या अध्यक्षांनी कळवले आहे.]



अनुक्रमणिका






# प्रसारमाध्यमे आणि मराठीचा विकास

मराठी अभ्यास परिषदेने महाराष्ट्र दिनाचे औचित्य साधून १ मे २००५ रोजी 'प्रसारमाध्यमे आणि मराठी भाषेचा विकास' या विषयावर एक परिसंवाद एस्.एम्. जोशी सभागृहात आयोजित केला होता.

दूरचित्रवाणी कार्यक्रमांचे निर्माते, दिग्दर्शक, लेखक आणि अभिनेते श्रीरंग गोडबोले, आकाशवाणीच्या प्रादेशिक वृत्त विभागातील साहाय्यक संपादिका संज्योत आमोंडीकर आणि संज्ञापन आणि वृत्तपत्रविद्या विभागातील अधिव्याख्याता उज्ज्वला बर्वे यांची या परिसंवादात भाषणे झाली. परिषदेचे उपाध्यक्ष प्र.ना. परांजपे परिसंवादाच्या अध्यक्षस्थानी होते. परिषदेच्या कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी सर्वांचे स्वागत केले व वक्त्यांचा परिचय करून दिला. अध्यक्षांनी परिसंवादाची सुरुवात करून देताना नभोवाणी आणि चित्रवाणी या माध्यमांचा वाढता प्रभाव लक्षात घेता व परिसंवादात सहभागी होणारे सर्व वक्ते नभोवाणी व चित्रवाणीशी संबंधित आहेत हे पाहता ती माध्यमे आणि मराठीचा विकास या विषयी सांगोपांग चर्चा होईल अशी अपेक्षा व्यक्त केली.

श्रीरंग गोडबोले यांच्या मते चित्रवाणी वाहिन्यांवरील कार्यक्रमांचे स्वरूप ठरवताना जाहिरातदारांचे मत विचारात घ्यावे लागते. ज्या कार्यक्रमांना प्रेक्षकवर्ग मोठा आहे त्या कार्यक्रमांना जाहिराती जास्त मिळतात. त्यामुळे ज्या कार्यक्रमांना जाहिराती किंवा प्रायोजक मिळतील असेच कार्यक्रम तयार करावे लागतात. भाषेच्या विकासाला चालना मिळेल असे कार्यक्रम करण्याची इच्छा असली तरी ते शक्य होतेच असे नाही अशी खंत त्यांनी व्यक्त केली. 'नक्षत्रांचे देणे' या कार्यक्रमामुळे मराठी प्रेक्षक पुन्हा एकदा मराठी कवितेकडे, गाण्यांकडे वळला याचे समाधान मिळाले असे त्यांनी सांगितले. मराठी साहित्यातील दर्जेदार कथांवर आधारित 'पिंपळपान' या कार्यक्रमाकडे मात्र रसिकांनी पाठ फिरवली असा अनुभव त्यांनी सांगितला. नभोवाणी, चित्रवाणी, संगणक, भ्रमणध्वनी इ. सर्व दृक्‌श्राव्य माध्यमांचा नजीकच्या भविष्यकाळात संयोग होणार आहे. त्यामुळे आपल्याला हवा असलेला कार्यक्रम कोणत्याही वेळी व कोणत्याही ठिकाणी पाहणे शक्य होणार आहे. साहजिकच विविध प्रकारच्या

कार्यक्रमांची मोठी बँकच प्रसारणकर्त्यांना तयार ठेवावी लागेल. माध्यम-संयोगाचे (मीडिया-कॉन्व्हर्जन्स ) हे आव्हान पेलण्याची क्षमता मराठीमध्ये आहे का आणि मराठी त्यासाठी तयारी करत आहे का असा प्रश्न त्यांनी आपल्या भाषणाच्या शेवटी उपस्थित केला.

उज्ज्वला बर्वे यांनी नभोवाणी आणि चित्रवाणी या माध्यमांतील बातम्यांच्या अनुषंगाने आपले विचार मांडले. प्रसारमाध्यमाच्या भाषेचा मोठा परिणाम जनतेच्या भाषेवर होतो हे लक्षात घेऊन नभोवाणी आणि चित्रवाणी या माध्यमांत काम करणाऱ्या पत्रकारांनी भाषेचा वापर अचूक करावा अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली. वृत्तनिवेदकांनी उच्चार, हेल इत्यादी गोष्टींकडे विशेष लक्ष पुरवावे अशीही सूचना त्यांनी केली. परदेशात स्थायिक झालेले भाषक त्या त्या देशात, समाजात मराठी भाषा टिकून राहावी, नव्या पिढीत ती रुजावी आणि वाढावी यासाठी नभोवाणीसारख्या माध्यमाचा चांगला उपयोग करून घेत आहेत असे त्यांनी सांगितले. ऑस्ट्रेलियातील 'आकाशवाणी सिडनी', आखाती देशातील मराठी भाषकांसाठी सुरू झालेले 'मी (एम.ई.= मिडल ईस्ट) मराठी', हे नभोवाणी केंद्र यांचा त्यांनी उल्लेख केला. संज्योत आमोंडीकर यांनी पुण्यातील प्रादेशिक वृत्त विभागातील सकाळी सात-पाचच्या बातमीपत्राच्या संदर्भात आपले विचार मांडले. शुद्ध आणि अचूक भाषा वापरण्यावर या विभागात सगळ्यांचा कटाक्ष असतो असे त्या म्हणाल्या. एका मान्यवर व्यक्तीने लिहिलेली अशुद्ध संहिता त्याला दुरुस्त करायला लावण्यास आपण कचरलो नाही, अशी आठवण त्यांनी सांगितली. एक कोटी श्रोते हे बातमीपत्र ऐकतात, त्यामुळे संपादिका म्हणून आपल्यावर भाषेच्या बाबतीत काटेकोर राहण्याची मोठी जबाबदारी आहे, असेही त्यांनी सांगितले.

भाषणांनंतर झालेल्या चर्चेत अनिल पारगावकर, 'समर्थ मराठी संस्थे'चे अनिल गोरे, सिडनी (ऑस्ट्रेलिया) येथील वैजयंती मोने, गं.ना. जोगळेकर, श्याम भुर्के, स.म. परळीकर, होळकर इत्यादींनी आपले विचार मांडले. अध्यक्ष प्रा. परांजपे यांनी समारोप केला. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी आभार मानले. ■

**शुद्धिपत्र :** वर्ष २३, अंक २, (उन्हाळा, २००५)

अनुक्रमणिकेत (ओळ ६) 'धोंगडे' ऐवजी 'धोंडगे' वाचावे.

पृ. ३३ व ३४ (ओळ : अनुक्रमे ६ व १) कोष्टकातील तिसऱ्या स्तंभाचे शीर्षक 'वितरण' ऐवजी 'विवरण' वाचावे.

लेखक-परिचय (आवरण पृ. ३ ओळ ५) 'आहे' ऐवजी 'आहेत' वाचावे.



अनुक्रमणिका






**लेखक परिचय**

- **हेमंत कर्णिक :** मुंबईत शिक्षण, 'चार्वाक' व 'अबब हत्ती' या वार्षिकांचे सहसंपादक. काही काळ 'बँक ऑफ इंडिया'मध्ये नोकरी. सध्या 'सर्च' या संस्थेत 'संज्ञापन अधिकारी'. पी.साईनाथ यांच्या इंग्रजी पुस्तकाचे 'दुष्काळ आवडे सर्वांना' हे भाषांतर. त्याला 'महाराष्ट्र फौंडेशन'चा पुरस्कार.
- **कल्याण काळे :** बार्शी व पुणे येथे शिक्षण. बार्शी, नंदुरबार, पुणे येते अध्यापन. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे काही काळ प्रमुख. तेथून 'प्रोफेसर' म्हणून निवृत्त. २० पुस्तके, १५०च्या वर लेख. भाषाविज्ञान, संतवाङ्‌मय हे अभ्यासाचे विषय.
- **डॉ. द. भि. कुलकर्णी :** नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागाचे (निवृत्त) प्रमुख. नामवंत समीक्षक व लेखक.
- **डॉ. नीलिमा गुंडी :** स.प.(कनिष्ठ) महाविद्यालय, पुणे येथे मराठीच्या अधिव्याख्याता. ''कविता : विसाव्या शतकाची''च्या सहसंपादक. काव्यसंग्रह व बालसाहित्य प्रकाशित.
- **वा. भा. जोशी :** एम्.ए.,बी.एड्. गरवारे प्रशाला व कनिष्ठ महाविद्यालयात मराठीचे अध्यापन. (आता निवृत्त). दै. 'केसरी'मध्ये 'दहावीचा अभ्यास' या सदरासाठी मराठी विषयासंबंधी गेली तीस वर्षे लेखन. दैनिके व नियतकालिकांत ललित लेखन.
- **डॉ. विजया देव :** भाषाविज्ञानात एम्.ए.,पीएच्.डी., मराठीमध्येही एम्.ए., पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात अधिव्याख्याता. दोन अनुवादित व एक संपादित अशी तीन पुस्तके प्रकाशित. अंधांसाठी मराठी साहित्यकृतींचे ध्वनिमुद्रण. ललित व संशोधनपर लेखन.
- **डॉ. दिलीप धोंडगे :** सटाणा येथील कर्मवीर सोनवणे महाविद्यालयातील मराठी विभागाचे प्रमुख. पीएच्.डी. प्रबंधास मु.श्री. कानडे पुरस्कार, संतपीठाचा रु. २५ हजाराचा पुरस्कार व डॉ. व. दि. कुलकर्णी समीक्षा पुरस्कार. पुणे विद्यापीठाच्या ३ पाठ्यपुस्तकांचे संपादन. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठासाठी ५ पाठ्यपुस्तकांचे लेखन. मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कार.
- **डॉ. मॅक्सीन बर्नसन :** अमेरिकेत जन्म, भारतीय नागरिकत्व. ''फलटणमधील मराठी'' या विषयावर पेन्सिल्वानिया विद्यापीठाची भाषाविज्ञानातील पीएच.डी. (१९७३) जाई निंबकर यांच्या सहकार्याने विदेशी विद्यार्थ्यांसाठी मराठीची दहा पुस्तके. फलटण येथील 'प्रगत शिक्षण संस्थे'च्या संस्थापक व संचालक. साने गुरुजी, पाध्ये, पद्‌मजा राणी बंग इ. पुरस्कारांच्या मानकरी.
- **स्वामिनी रुद्रभटे :** फलटण येथील 'कमला निंबकर बालभवन' येथे मराठीच्या अध्यापक.

**मागील अंकातील दोन प्रतिसाद-लेखकांचा परिचय**

- **प्रा. भगवंत देशमुख :** महाविद्यालयीन व विद्यापीठीय पातळ्यांवरील मराठीच्या अध्यापनाचा अनुभव. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयाचे निवृत्त प्राचार्य. नामवंत समीक्षक व लेखक.
- **सत्त्वशीला सामंत :** महाराष्ट्र शासनाच्या भाषा-संचालनालयाच्या निवृत्त उपसंचालक, 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' हे पुस्तक प्रकाशित.

---

## 'भाषा आणि जीवन'कडे परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- 'शास्वत मौनाचे स्वगत' : लखनसिंग कटरे, मराठी जनहित साहित्य परिषद, अमरावती.
- 'आदिम प्रकाशचित्रे' : लखनसिंग कटरे, मराठी जनहित साहित्य परिषद, अमरावती.
- 'मराठीचिये नगरी' : श्री. ना. चाफेकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
- 'माझे घराणे' : गो.रा. संगोराम, प्रकाशक : मिलिंद संगोराम, पुणे.
- 'विश्वनाथ खैरे यांचा संमतविचार आणि नवी भारतीविद्या' : स. ह. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई.

**धन्यवाद**

'मराठी अभ्यास परिषदे'ला या वर्षी पुढील देणग्या मिळाल्या :

१. प्रा. लीला पाटील, कोल्हापूर रु. ४,०००/-

२. प्रा. (डॉ.) द. पं. जोशी. हैदराबाद रु. २,०००/-

हा उपक्रम अनुकरणीय आहे !

( १ ) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे.

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/- फक्त

व्यक्तीला रु. १००/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/- फक्त

परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्चासाठी रु. १००/- अधिक पाठवावेत.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/- फक्त.** आजीव सदस्यांना 'भाषा आणि जीवन'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धेपान रु. १,५००/-, पाव पान रु.८००/, शुभेच्छा सूचना रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.



अनुक्रमणिका

बुकपोष्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक     R. N. I. नोंदणी क्रमांक : ० - ४००४८/८३

या अंकाची किंमत रु. २५/-



प्रेषक

**कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५

वाडिया हॉस्पिटलसमोर,

पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)